# श्री ज्ञा ने श्व री

(सुबोधिनी)

---

## अध्याय पहिला

## “ अर्जुनविषादयोग ”

---

फलटण

१९५५

डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर

श्रीगणेशायनमः । श्रीगोपालकृष्णायनमः । श्रीगुरुभ्योनमः ।



# श्रीज्ञानेश्वरी - सुबोधिनी

## अध्याय पहिला

## अर्जुनविषादयोग

॥ श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ॥

श्रीकृष्णपरमात्मनेनमः । श्रीमद्भगवद्गीता ज्ञानेश्वरी । श्रीपांडुरंग समर्थ ।

वसुदेवसुतं देवं कंस चाणूरमर्दनम् । देवकी परमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ हरिः ॥

ॐ नमो श्री आद्या । वेद प्रतिपाद्या ।
जय स्वसंवेद्या (जी तु स्वसंवेद्या) । आत्मरूपा ॥ १ ॥

देवा तूंचि गणेशु । सकळार्थ मतिप्रकाशु ।
म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥ २ ॥

हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवतसे ॥ ३ ॥

स्मृति तेचि अवेव । रेखा आंगिक भाव ।
तेथें लावण्याची ठेव । अर्थ शोभा ॥ ४ ॥

अष्टादश पुराणें । तेंचि मणिभूषणें ।
पदपद्धति खेवणें । प्रमेय रत्नांची ॥ ५ ॥

पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर ।
तेथें साहित्य वाणे सपुर । उजाळाचें ॥ ६ ॥

देखा काव्य नाटका । जे निर्धारिता सकौतुका ।
त्याचि रुणझुणती क्षुद्र घंटिका । अर्थध्वनि ॥ ७ ॥

प्रमयाची परी । निपुणपणें पाहाता कुसरी ।
दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥

तेथ व्यासादिकांचिया मति । चोखाळपणें झळकति (झळति) ।
तिये मेखळा मिरवति । पल्लवसडका ॥ ९ ॥

**देखा षड्दर्शनें म्हणिपति । तेचि भुजांची आकृति ।**
**म्हणौनि विसंवादें धरिति । आयुधें हातीं ॥ १० ॥**

**तरी तर्क तोचि परशु । नीतिभेद अंकुशु ।**
**वेदान्त महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥**

**येके हातीं दंत । जो स्वभावें अखंडित ।**
**तो बोधमत संकेत । वार्तिकाचा ॥ १२ ॥**

**मग सहजें सत्कारवादु । तोचि पद्मकरु वरदु ।**
**धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभय हस्तु ॥ १३ ॥**

**देखा विवेकवंत सनिर्मळ । तोचि शुंडादंड सरळ ।**
**जेथ परमानंद केवळ । महासुखाचा ॥ १४ ॥**

**तरी संवाद तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु ।**
**देवो उन्मेष लोचनु । विघ्नराजु ॥ १५ ॥**

**मज अवगमलिया दोन्हीं । मिमांस श्रवणस्थानीं ।**
**बोधामोद अमृतमुनि । अलि सेविती ॥ १६ ॥**

**प्रमेयप्रवाळ सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ ।**
**सरिसे एकवट इभ । मस्तकावरी ॥ १७ ॥**

**उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञान मकरंदें ।**
**तियें कुसुमें मुगुटि सुगंधे । शोभति भलीं ॥ १८ ॥**

**"अ" कार चरणयुगुल । "उ" कार उदर विशाळ ।**
**"म" कार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥**

**हे तिन्ही येकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।**
**तें मियां गुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥**

ॐ=ओंकार, ब्रह्मनाम ग्रंथारंभीं मंगल म्हणून योजिलेलें. नमो श्री-नमो जी. नमो=नमस्कार असो. श्री = तापविणें, शिजविणें, अधिश्री. श्रि = वास करणें, पूजा सत्कार करणें, आश्रय करणें, स्थितीला जाणें, अवलंबणें, चिकटून राहाणें, वास करणें. जी = जि=वश करणें, ताब्यांत ठेवणें, उत्कर्ष पावणें, सर्वश्रेष्ठ होणें, रोग घालविणें, जिंकून मिळविणें. आद्या = मूळ कारण : आदिपुरुष जो त्यास. वेदप्रतिपाद्या = वेदांकडून प्रतिपाद्य विषय झालेल्या : वेदांनीं वर्णिलेला. जय = जयजयकार असो (-जयजय). स्वसंवेद्या = स्वतःच स्वतःस जाणणारा. स्व म्हणजे जीव जो परमात्म अंश त्याजकडून जाणण्यास योग्य अशा (-जी तु स्वसंवेद्या. पा.भे.). आत्मरूपा=तत्त्व, आत्मरूप जें सर्वव्यापक अशा सर्वभूतांच्या ठायीं असलेला आत्मा मी, असें भगवान् श्रीकृष्ण सांगत आहेत (१). गणेशु तूंचि देवा=गणपति दैवत तूंचि : इंद्रियसमूहांना स्वामी गण, गणेशु. देव=खेळणें. देव=ईश्वर, देवता, राजा (देवयोनि=यक्षगंधर्वादि उपदेवता) गण = मोजणें, समुदाय (गणश = टोळ्या-टोळ्यांनीं). सकळार्थ मतिप्रकाशु-सकळमतिप्रकाशु=सर्वच्या सर्व-सकल विषयांमध्यें, अर्थामध्यें-प्राणिमात्रांच्या बुद्धीला ज्ञानप्रकाश देणारा. म्हणे निवृत्तिदासु-निवृत्तिशिष्य ज्ञानदेव म्हणतात. अवधारिजो जी-अवधारिजो= जी सन्मानार्थ, ऐकावें जी अहो (२). हें शब्दब्रह्म अशेष = हे वेद-सकल वेदशास्त्रादि अखिल वाङ्मय. मूर्ति सुवेष=सुंदर दिसावी अशी सजविलेली, अलंकारित केलेली : वर्णवपु=५२ वर्ण, १६ स्वर, ३६ व्यंजनें,

अकारादि स्वर-ककारादि व्यंजनें. वपु = रमणीय आकार, तेज, स्वरूप, स्वरूपमूर्ति, आकार, शरीर. वपुष्मान् = सुंदर. मूर्तिमंत = सु। कसु। वेश-वेष = प्रवेश, संचार, पोशाख (वेशदान = सूर्यफूल). निर्दोष = व्यंगरहित, दोषरहित, अव्यंग, पापरहित, अनिष्ट गुणरहित. मिरवतसे-मिरवत असे = शोभत आहे (३).

स्मृति तेचि अवेव-अवयव = (मनुस्मृति) श्रुति, स्मृति, वेद, उपनिषदें. रेखा (देखा) = रेखाटलेले, रेखीव असे देखणें पाहाणें करणारे. आंगिक भाव = आंगचें रूप, भावनांचें प्रदर्शन, देहासंबंधीं विलास, स्वभाव, अवयवांच्या द्वारें होणारे. लावण्याची ठेव = सौंदर्यनिधि, देह, शरीर, बांधा, ढब, सौंदर्याची ठेवण. अर्थ शोभा = पुरुषार्थ चारी, सौंदर्य, तेज (४). अष्टादश पुराणें = ब्रह्म, पद्म, ब्रह्मांड, अग्नि, विष्णु, गरुड, ब्रह्मवैवर्त, शिव, लिंग, नारद, स्कंद, मार्कंडेय, भविष्य, मत्स्य, कूर्म, वराह, वामन व भागवत. पुराण = प्राचीन व्यासप्रणित पंचलक्षणयुक्त ग्रंथ, नाम, गुण, वर्णना, खूण :: भागवत = विष्णुभक्त, भगवत् भक्त-मूळ जाति, पवित्र :: पंचदशी = पौर्णिमा, अमवास्या, एक वेदांतपर ग्रंथ. पंचजन = मनुष्य. पंचपंचक = पांचाचा समुदाय. पंचजनी = पांचाची सभा. पंचतन्मात्रा = रूप, रस, गंध, शब्द आणि स्पर्श. अष्टादश उपचार = पूजा, सत्कार, आसन, स्वागत, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नान, वस्त्रोपवीत, भूषण, गंध, पुष्प, दीप, धूप, अन्नतर्पण, माल्य, अनुलेपन, नमस्कार, विसर्जन. मणिभूषणें = रत्नरूपी मनगटाचीं भूषणें. मणिबंध = मनगट, एक छंद. पदपद्धति = वाक्याचा अवयव, चरण, रीति, आचार, व्यवसाय. खेवणें = कोंडणें, आलिंगणें, खोविलेली, रंगविलेली, जाणें, लिंगाप्रमाणें रूप बदलणें, रूप धरणें. प्रमेय रत्नांची = सिद्धांतरूपी उत्तम वस्तूची, तत्त्वार्थरूपी रत्नांची (५). पदबंध = (पद = जाणें, चतुर्थांश, पाय, वाक्याचा अवयव, व्यवसाय, चिन्ह, स्थान, पदवी. बंध = बांधणें, देह, करार ठेव, बंधन) = पदवी देह, देह पदवी, करार, वाक्यावयव, देहव्यवसाय, देहबंधनस्थान. नागर = नगरसंबंधीं, दीप, रसज्ञ, सभ्य, बालबोध लिपी. रंग = वर्ण, नाट्यशाला, रणभूमि. रंगाथिले = रंगविलेलें. अंबर = आकाश, कापड, मेघांचा समुदाय, कापूस. अंबरम् = नूतन वस्त्रस्य ४—अनाहतम्। निष्प्रवाणि। तंत्रकम्। नवाम्बरम्। धौतयोर्वस्त्रयोर्युगम् यत्तत् उद्गमनीयम् इति। साहित्य बाणे सपुर उजाळाचे = तेथें अलंकारसाहित्य-शास्त्र रंगानें व वर्णानें संपूर्णपणें प्रकाशमान-तेजस्वी-झालेलें. बाण = वर्ण, रंग. सपुर = प्रकाशानें का पूर्णतेनें सहिततेचे, सदृश, एकच, संपूर्ण, पूर्ण भरणें जें, तोषविणें जें, ओतणें, घालणें, श्वास आंत घेणें जें (६).

देखा, रेखा = देखणें, पाहाणें, रेखा रेखीव. काव्य नाटका-काव्य = कवित्वाचे, स्फूर्तीचे, बुद्धीचे, सुखाचे. नाटका-नट, सोंग घेणारा, नाचणारा, व्रात्य-क्षत्रियोत्पन्न जातिविशेष (पवारी व.) इंद्रसभानाटकनट (काव्य कवित्व शहाणपण सुख स्फूर्ति शुक्राचार्य बुद्धि पूतना भविष्यवाद)-क्षुद्र घंटिका = लहानशा घंटा, घंटिका. अर्थध्वनि = शब्दाचा भावनाद. रुणझुणती = रुणझुण रुणझुण ध्वनि करणारे (भ्रमरनाद). कौतुक = उत्सुकता, आनंद, जिज्ञासा, उत्सव, क्रीडा, लग्नकंकण, स्वागत, गान, नृत्य, आश्चर्य, मंजीरो किंकिणि क्षुद्रघंटिकाः॥ मंजीर, नूपुर, तुलाकोटिः, पदांगदम्, हंसकः, पादकटकः, इति ६ नूपुरस्य। (७). प्रमेय = तत्त्वार्थ, नाना प्रकारचे श्लेष. निपुणपणें पाहाता कुसरी = बारकाईनें प्रेमळपणानें पाहातां हींच त्या घागऱ्याच्या मधून मधून गुंफलेलीं कौशल्याचीं रत्नें होत-पदे, पद्धतीची ती संयोग समागम तेथें अनेक अर्थ (श्लेष, उपमा, अलंकार) उत्तम रत्नेंच त्यामध्यें दिसत आहेत. चंद्रमंडलस्य षोडषो भागः कला. चंद्र = द्विजराजः। कलानिधि। जैवातृकः इत्यादि २०. कलाकेलि = मदन, विलासी, शिल्पकला, गीत, नृत्य, इत्यादि ६४. कलामूर्ति। (कला) कुसरी = कौशल्य। कलानौका। कलाकिरण। कलाशक्ति।- पदे (क्रिया) आरंभादयो नवशब्दाः क्रियाः — आरंभः निष्कृतिः शिक्षा पूजनम् संप्रधारणम्। उपायः कर्मचेष्टा च चिकित्सा च नव क्रिया॥ [क्रिया (क्रिया) १) करणें, अमलांत आणणें. २) कृत्य. ३) श्रम. ४) शिक्षण. ५) विद्या. ६) विचार. ७) पंथ, कृति. ८) पूजा इत्यादि धर्मकृत्यें. ९) मृताची क्रिया. १०) प्रायश्चित्त. ११) उपचार, इलाज. १२) साधन, उपाय. १३) समाप्ति, सिद्धि.] (८).

व्यासादिकांची मति बुद्धि चातुर्यें ती मेखळा कमरेचा शेला मिरवती शोभत आहे–चोखाळपणें बुद्धीची तेजस्विता हे शेल्याची सुंदर पल्लव सडका पदरांच्या दशा झळकत आहेत. मेखला = कमरपट्टा, कटिसूत्र (पर्वताची बाजू, यज्ञकुंडाभोंवतालची समिधा, करगोटा, कमरेचें वस्त्र, नर्मदा नदी). पल्लवसडका = सडक लांब अशा पदराच्या दशा होत. (मति–बुद्धिर्मनीषा धिषणाधीः प्रज्ञाशेमुषी मतिः। प्रेक्षोपलब्धिश्चित् संवित प्रतिपज्ज्ञप्तिचेतना ॥ १४ बुद्धि ॥) उपलब्धि = प्राप्ति, अनुभव, अंदाज, बुद्धि. प्रतिभा = चेहरा, स्वरूप, तेज, प्रकाश, बुद्धि, अलौकिक बुद्धि, प्रतिउत्पन्नमति–प्रत्युत्पन्नमति, स्फूर्ति, मन दुसरीकडे जाणें, विक्षेप, धिटाई, प्रतिबिंब. खड्गस्य मुष्टेः निबंधनं मेखला, स्त्रीणां कटिभूषणस्य शृंखलम् इति मेखला–मेखला, कांची, सप्तकी, रशना, सारसनम् इति–पुंसः कटिभूषणस्य त्रिषु पुनपुंसकेषु। वस्त्रस्य द्वयोर्वस्तयोः प्रांतयोः दशाः स्युः ॥ (वामस्कंधे धृतोशरीरस्य–प्रावारः। उत्तरासंगः। बृहतिका। संव्यानम्। उत्तरीयम् इति ॥). पल्लव (= सडका–सडक–लांबसडक हात, लांबसडक केशकलाप, लांब पदर,) विस्तार, विकास, प्रेम, पदर, शृंगार, बल, अळत्याचा रंग, जार, मत्स्य (वि.), कोंब, कळी, पालवी, फांदी :: कटिसूत्र = (कटि = कंबर, गंडस्थळ, पिंपळी, सूत्र = जानवें, तार, कमरबंध, दोरा, सूत, तंतू, निमित्त, सूत्रमय ग्रंथ, निवाडा, महत्तत्त्व, व्यवस्था, नियम, कायदा, सूचना, संक्षिप्त स्पष्टार्थक व व्यापक नियम. सूत्रकंठ = ब्राह्मण.) = करगोटा, कमरपट्टा. कटिशृंखला = कमरेंतील घागऱ्या (९). देखा षड्दर्शनें म्हणिपति–म्हणिपे, आज्ञा, काम, म्हटलें जातें तसेंच सहा शास्त्रें. तेचि भुजांची आकृति = हे गणपतीचे सहा हात होत.–विसंवादें = मतांतररूपी हातीं आयुधें धरिती = हीं हातांतील भिन्न भिन्न आयुध होत. षड्दर्शनें = सहा हात. मतभेद = शास्त्रास्त्रें (१०).

तर्कशास्त्र म्हणजेच परशु. नीतिभेद न्यायशास्त्र तोच अंकुश होय. वेदांत महारसु मोदकु मिरवे = वेदांत हा रसाळ व मधुर अशा मोदकाप्रमाणें शोभत आहे (११). दंत, स्वभावें खंडित, बौद्धमत संकेत वार्तिकाचा = व्याससूत्रावरील वृत्तीच्या व्याख्यानानें ज्या मतांचे स्वभावेंकरूनच खंडण झालें तो बौद्धमत हाच चौथ्या हातांतील खंडित दांत होय (१२). सत्कार वाद = सत् तर्क वाद = सत्तर्क वाद = सत्य वस्तूचा अंदाज करणें, विचार करणें संबंधीं मत. सत्पक्ष मंडनाचा उन्मेष = उमलणें, उघडणें, तेज, चमक, विस्तार, जागृत होणें. आमोद = उग्र वास. तर्क = कल्पना, अनुमान, न्यायशास्त्र, हेतु. सहजें = जन्मसिद्ध, स्वाभाविक. सत्कार–आतिथ्यपूजन (वाद = चर्चा). सत्कार्यवाद = विवर्तवाद, परिणामवाद. पद्मकर वरद = वरदायक असा कमलाकृति हात. धर्मप्रतिष्ठा = सत्पक्ष मंडनाचे. सिद्ध = त्रिकालज्ञ, नित्य. अभय हस्तु = सहावा अभय हस्त हा धर्मसंस्थापनेचा दर्शक होय (१३). विवेकवंत सनिर्मळ = अत्यंत पवित्र आणि बोधप्रद सारासार विचार, आत्मानात्म विचार. तोचि शुंडादंड सरळ = सरळ शुंडादंड असून. तेथ परमानंद केवळ महासुखाचा = तेथें महासुखाचे, मूळ ब्रह्म तो ओतप्रोत भरून राहिला आहे. निर्मळ विचार ही सोंड (१४). संवाद = संभाषण, चर्चा. दशनु = दांत, शिखर. समता शुभ्र वर्णु = समत्वरूपी एकरूपता, सादृश्य. देवो उन्मेषलोचनु विघ्नराजु = गुरुशिष्याचा संवाद हा सरळ शुभ्रवर्णाचा दांत होय–असा हा सूक्ष्मेक्षणु = पाहाणें, डोळा–ज्ञानरूपी सूक्ष्म दृष्टि असलेला विघ्नहर्ता देव आहे. संवाद तो शुभ्र दंत. ज्ञानप्रकाशस्फुरण ते सूक्ष्म नेत्र (१५).

गम + अव् = उतरणें, जवळ जाणें, जाणणें, समजणें, मानणें, कल्पणें, मिळवणें, कळविणें, शिकविणें, सुचविणें, दर्शविणें, समजून घेणें. मज अवगमलिया दोन्हीं = मजला त्या दोन पूर्व आणि उत्तर मीमांसा भासत आहेत. मिमांस श्रवणस्थानीं = मीमांसा त्या दोन कानांच्या ठिकाणीं. बोधामोद अमृतमुनि अलि सेविती = गंडस्थळांतून स्रवणारा जो ज्ञानामृतरूपी मद त्याचें प्राशन करणारे जे मुनि तेच कोणी भ्रमर होत. मीमांसा हें श्रवण. मुनि हे भ्रमर. बोध अमृत हा त्या गंडस्थळांतून स्रवणारा मद (१६). प्रमेय प्रवाळ सुप्रभ = सिद्धांतांतील तत्त्वार्थ हीच तेथील सुतेज पोवळीं होत. द्वैताद्वैत तेचि निकुंभ = द्वैत अद्वैत हीच गजमस्तकांतील सारख्या आकाराचीं गंडस्थळें होत. इभ = सरिसेपणानें, एकवटलेले. प्रवाळ = रत्न. अंकुरे अपि शब्दात्

प्रवालेऽपिप्रवालम् विद्रुम प्रवालः इति प्रवालस्य। विणायाः दण्ड प्रवालः। (१७). (दश) उपनिषदें जियें उदारें ज्ञान मकरंदें = ज्ञान मकरंदानें भरलेलीं जीं (दहा) उपनिषदें तींच तियें मुगुटि कुसुमें सुगंधे शोभति भली = ती त्या गंडस्थळाच्या मुकुटावर शोभणारी सुगंधित पुष्पें होत. (पुष्प = सुमनसः पुष्पम् प्रसूनम् कुसुमम् सुमम् इति ५ पुष्पस्य। पुष्परस, मकरंद इति पुष्पमधुनि।). उपनिषदें हीं सुगंधी फुलें (१८). "अ" कार चरणयुगुल = ओंकारांतील "अ" कार हे दोन पाय. "उ" कार उदर विशाल = "उ" कार हेंच विशाल उदर. "म" कार महामंडळ मस्तकाकारें = "म" कार हेंच वर्तुळाकृति प्रधान अंग मस्तक होय. दोन चरण "अ" (विराट). विशाल उदर "उ" (हिरण्यगर्भ). मस्तक हें "म" (ईश्वर) (१९). तिन्ही येकवटले = "अ" कार, "उ" कार, "म" कार हे तिन्ही अवयव एकत्र झाल्यानें. तेथ शब्दब्रह्म कवळलें = वेदांची उत्पत्ति जें ओंकाररूप तयार झालें. तें मियां गुरुकृपा नमिलें आदिबीज = त्या आदिबीजाला– ओंकाररूपाला–मी श्रीगुरुकृपेंकरून वंदन करितों (२०).

ॐ नमो श्री आद्या–ॐ नमो जी आद्या = आदिपुरुषा, मूळ कारणा, आदिवर्ण ओंकार, प्रणव, ब्रह्मनाम : जय स्वसंवेद्या–जि तूं स्वसंवेद्या–जय जय स्वसंवेद्या = स्वतःस स्वतःच जाणणारा, परमात्म अंश जो जीव "स्व" त्याजकडून जाणण्यास योग्य अशा आत्मरूपा, सर्वभूतांच्या ठायीं असणारा आत्मा "मी" त्याचा जयजयकार असो. [१] श्रीआद्यपुरुष, जे पहिले (आदि) आधींचे श्रेष्ठ विष्णुरूप (स्त्रीलिंग तें दुर्गेचें) त्या मूळ ओंकाराला नमस्कार असो, त्यास नमन असो, त्यास मी नमस्कार करतों. [२] वेदांनीं प्रतिपादनास घेतलें आहे त्या–स्वतःला, संवेदन होण्याच्या विषयाला–आत्मरूपाला–आत्मरूपाचा जय असो–त्याचा जयजयकार असो. [३] जें वेदांनीं प्रतिपादनास, दानास, संपादनास, विवेचनास घेतलें आहे, श्रीआद्यानें शोभविलेले, प्रकाशलेले पुरुष जे पहिले आदि, आधींचे जे स्वतःसच संवेदन होण्याचा विषय, त्याला अशा आत्मरूपाला– आत्मीय रूप स्वतःचें, स्वतःच्या संबंधींचें असणारें, स्वाधीनतेचें जीवंतपणाचे असें रूप जे स्वभाव, शरीर, आकृति, प्रकार, सौंदर्य, वर्ण इत्यादींचें केलेलें त्या मूळ ओंकाराला नमन असो–वंदन असो–मी नमस्कार करतों–(१)

**गणपतीचें वर्णन :** हे देवा! तूंचि-तुम्हींच गणेश आहांत, गणपति आहांत, महागणेशदेव आहांत, इंद्रिय गणाचे समुदायाचे ईश, स्वामी आहांत. समानधर्मी शब्दांचा समूह (व्या.) त्याचे ईश आहांत. अवघ्या सकळ पुरुषार्थसंबंधीं जी मति–बुद्धि तिजला प्रकाशणारे आहांत असें निवृत्तिदास श्रीज्ञानदेव म्हणतात–असें हें जी आपण ऐकावें कीं जी अहो–(२)

हे समग्र शब्दब्रह्म म्हणजे वेद, वेदवाङ्मय तीच कीं एक मति, बुद्धि, उत्तम वेषाची–चांगल्या शोभेची शोभणारी अशी आहे. तेथें वर्णमूळाक्षरें तीं शरीरच कीं वर्णन करावें लागणारें, असें जें स्तुतीचें एक असें निर्व्यंग मानणारें, तें दोषरहित शरीर असें उत्तम सुंदर रेखीव अवयवांचें, तें आपण मिरवून आहांत–होऊन आहांत. अखिल वेद ते सुंदर मूर्तीनें शोभत आहेत. तेथें १६ अकारादि स्वर, ३६ ककारादि व्यंजनें इत्यादि बावन्न वर्ण हीच दोषरहित अव्यंग अशी वपु मिरवत आहे, शोभत आहे. संपूर्ण वेद गणपतीची सुंदर मूर्ति, वेदांतील स्वरव्यंजनादि हे सर्व त्या गणपतीचें सुशोभित व पवित्र शरीर–(३)

स्मृति, मनुस्मृति, श्रुति, स्मृति, वेद उपनिषदें हीच अवेव–अवयवरेखा, रेखाटलेले रेखीव असे देखणें पाहाणे करणारे देहसंबंधीचे विलास, स्वभाव, आंगचें रूप, आंगिक भाव, भावनांचें प्रदर्शन अवयवांच्या द्वारें होणारें तेथें सौंदर्याची जी ठेवण, बांधा, छब–ढब, सौंदर्यनिधि, लावण्याची ठेव, तीच चारीही पुरुषार्थांना शोभा आणणारी तेज सौंदर्ये होत. स्मृति मनुस्मृति, "संहिता सा स्मृतिः" रेखा आंगिक भाव–ओळ, कवित्व रचना रेखीव अशी ती अंगचा भाव शरीराचें रूप होत. चिंता स्मृतिः आध्यानम् स्मरणस्य। आंगिकम्–अंगेन निर्वृत्ते निष्पन्ने कर्मणि आंगिकम्॥ (स्मृति अवयवरेखा, कवित्वरचना, अंगाची ठेवण, आंगचे विलास, अर्थांची शोभा ती अवयवांचें मोहक सौंदर्य)–(४)

अष्टादश पुराणें (यत्पंचलक्षणं तत्पुराणमुच्यते) अठरा तीं पुराणें–प्राचीन व्यासप्रणीत:—ब्रह्म, पद्म, ब्रह्मांड, अग्नि, विष्णु, गरुड, ब्रह्मवैवर्त, शिव, लिंग, नारद, स्कंद, मार्कंडेय, भविष्य, मत्स्य, वराह, कूर्म, वामन व भागवत. तींच मनगटीं विलसणारीं, मनगटाचीं, मणिबंधाचीं, छंदाचीं, फुलाचे गजरे, भूषणें तेथें वाक्याचा अवयव, व्यवसायरूपी चरण रीति आचार, वाक्यावयवे ती कोंदणे आलिंगणे होत कशाची तर उत्तम वस्तू तत्त्वार्थ रत्न सिद्धांत रत्नांची कीं. अठरा पुराणें तीचि-रत्नमणि इति अश्मजातौ मुक्तादिके अपि वर्तते –मणिभूषणें, भूषणं, अलंक्रिया, भूषणक्रियायाः, जडित अलंकार, क्रियापद पद्धत हीच प्रमेय रत्न, तत्त्वार्थ–सिद्धांतरूपी रत्नजडित अलंकार (अभिध्येयोवाच्यः। राः धनम्। वस्तुतत्त्वम्। निवृत्ति निवर्तनम्। अत्र विषयेऽत्यर्थे). अठरा पुराणांतील भक्तीच्या अंगावरील रत्नजडित भूषणें पुराणांतील शब्दरचना ही त्या भूषणाचा घाट–त्यांतील तत्त्वार्थ तीं रत्नांचीं कोंदणें–(५)

देहपदवी, वाक्यावयव करार, देहव्यवसाय, पदवी देह तीच कीं सभ्यतेसंबंधीं, रसज्ञ नगरसंबंधीं तेच कीं रंगविलेलें वस्त्र का कापड तेथें अलंकार शास्त्र, रंगानें, वर्णानें, संपूर्णपणें प्रकाशमान तेजस्वी झालेलें तें, तेथें सदृश, एकच, पूर्ण भरणें जें तोषविणें, श्वास आंत घेणें जें तें प्रकाशानें पूर्णतेनें सहित–सदृश एकच असें तोषविणेंच कीं. पदबंध–क्रियापद बंध, रचना, काव्य उत्तम तेंच कीं रंगविलेलें वस्त्र–रंगाथिले अंबर–तेथें उजाळाचे असे सपूर साहित्य बाणलेले–अलंकार शास्त्र. हे तेथें शुभ्र लांब रुंद अशा वर्णाचे उजाळाचे आहे. काव्यपद्धति बंध सुंदर तेच रंगीत वस्त्र काव्यांतील अलंकार तेच त्या बारीक वस्त्रांतील चकाकणारे तंतु होत–(६)

देखणे देखा जे का कवित्वाचे स्फूर्तीचे बुद्धि–शहाणपण सुख कवित्व स्फूर्ति जेथीलची निवड, निश्चय, निर्धार, सकौतुक आनंद, उत्सव, क्रीडा, ईच्छा स्वागतसंबंधीं निर्धारणें त्या लहानशा घंटिका घागऱ्या रुणझुणणाऱ्या त्या मध्येंच कीं ती नीतिसंबंधीचा शब्द भाव नाद तो (काव्य कवित्व नाटक नट). विविध काव्य नाटकें यांची कौतुकानें योजना केली, त्यातून अर्थचमत्कार निघतात. ते रुणझुण ध्वनी मूळ बारीक घागऱ्यांचे घोस होत–(७).

बुद्धीच्या सुखाचे (नट, नाचणारा–व्रात्य, क्षत्रियोत्पन्नजातिविशेष। इंद्रसभा। नाटक) असे ते शब्दाचे भाव, नाद (नीतीसंबंधींचे) तेथें प्रमेय सिद्धांताची परी परोपरीची कला–कुशलता-कुसरी निपुणपणें, प्रेमळपणानें, सावधपणानें, बारकाईनें पाहिली असतां उचित योग्य अशींच पदें तीं तेथें शोभत आहेत, दिसत आहेत; वाहवानें शोभणारीं भलेपणाचीं रत्नेंच कीं (मार्मिकपणानें नानाप्रकारचे श्लेष पाहिले तर सिद्धांत पद्धतीची हीच त्या घागऱ्याच्या मधून मधून गुंफिलेलीं कौशल्याचीं रत्नें होत.)–(८)

तेथें श्रीव्यासाच्या मति–व्यास आदिकरून जे त्यांच्या मति–बुद्धि स्वच्छपणानें झळकत आहेत, तेजस्वी-पणानें तेथीलच्या मेखला (कमरपट्टा) त्या पदराचे अग्रभागच मिरवत आहेत; शोभत आहेत. प्रेमपदर, विलास, वन, श्रृंगार, पालवी विस्तार ते पदरास दिलेले अग्रभाग (अहो शब्दासच शब्दाचे पल्लव लावले तेथें शब्दच शब्दास उल्लंघून गेला–आपले सौंदर्याचा झाल्याने अप्रतीमतेचे तें स्वरूप, सौंदर्य गान प्रकरण शब्द अगाधतेच्या बाण्यानें मिरवत शोभत प्रसन्नतेस येत आहेत कीं) व्यासादिकांच्या मति–बुद्धि चातुर्य सीमा हीच कमरेचा शेला शोभत असून, त्या बुद्धीची तेजस्विता ही त्या सुंदर शेल्याचे पदर–पदराच्या दशा झळकणाऱ्या अशा–(९)

प्रसिद्ध सहा शास्त्रें हे गणपतीचे सहा हात होत. मतांतरें तीं हातांतील आयुधें होत. पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा आणि वेदांत हीं सदा दर्शनें म्हटलीं जातात. तेथें मतमतांतराचा विसंवाद तो, तीच कीं आकृती भुजांना आली आहे–आयुधांना हातीच्या आकृतीचे ते भुज सहा असे अंगिकारून आहे; सहा दर्शनें तीच भुजांची आकृति म्हणून मतांतर विसंवाद–(वचन न पाळणें, असंबद्धता, मेळ नसणें, फेरफार) तेथें आयुधेंच होतीं, आलीं, होत आहेत–(१०)

महारस (ऊंस, खर्जुर, पारा, कांजी) वेदांत महारस तो मोदकरूपानें मिरवत,-शोभत आहे, तर्क (न्यायशास्त्र परशु) परशुरूपानें, नीतिभेद (अर्थशास्त्र) अंकुशरूपानें शोभत आहे. तर्क तोच परशु, नीति न्यायशास्त्र, भेद तोच अंकुश. वेदांत हा रसाळ व मधुर अशा मोदकाप्रमाणें हातीं शोभत आहे-(११)

व्याससूत्रावरील वृत्तीच्या व्याख्यानानें खस्त दिलेलें वार्तिक बौद्धमत हाच गणपतीच्या हातांतील खंडित दांत होय. बौद्धमत खंडन संकेत हा एके हातीं दांत तो स्वभावेंकरूनच कीं व्याससूत्रावरील वृत्तीच्या व्याख्यानें-करूनच कीं खंडित झालेला-(१२)

सत्तर्केवाद-सत्य वस्तुसंबंधीं अंदाज करणें; विचार करणें, संबंधी मत; आतिथ्य पूजन वाद-चर्चा-सत्कार्य वाद, विवर्तवाद, परिणामवाद, कमलाकृति हात वरदायक असा पांचवा हात तो सत्पक्षमंडनाचा एक असून, सहावा अभयहस्त हा धर्मसंस्थापनेचा दर्शवितो. सहज सत्कारवाद, इच्छित वस्तु देणारा कमलाहस्त (वरद पद्मकर) लक्ष्मीकर, व अभयहस्त, सिद्ध असा धर्मप्रतिष्ठेचा होय-(१३)

सारासार विचार, आत्मानात्म विवेक, पवित्र बोधप्रद, तो शुंडादंड असून महासुखाचे मूळच तो, केवळ परमानंद तो, ब्रह्मांडी ओतप्रोत भरून राहिला आहे-(१४)

संभाषण चर्चा, संवाद तो दशनु-दांत तो शुभ्रवर्णाचा समता, समत्व, एकरूपता, सादृश्य तो विघ्नराज देव सुक्ष्मेक्षणु पाहाणें, डोळा जें का तो उन्मेषलोचन कीं-गुरुशिष्य संवाद शुभ्र वर्णाचा दांत होय. असा ज्ञानरूपी सूक्ष्मदृष्टि असलेला विघ्नहर्ता देव आहे-(१५)

ही दोन्ही मी समजून घेतल्यावर-पूर्व मीमांसा तसेंच उत्तर मीमांसा-ह्याच कीं श्रवणस्थानीं मानलेल्या तेथीलचा बोधरूपी आमोद अमृत मुनिरूपी भ्रमर हे सेवन करतात-(१६)

प्रमेय, प्रवाळ, सुप्रभ, द्वैत-अद्वैत तेच हे इभच कीं मस्तकावर सरिसेपणानें एकवटलेले आहेत-(१७)

वर दशउपनिषदें जीं उदार अशीं ज्ञानमकरंदें तींच कीं पुष्पें कुसुमें सुगंधीत अशीं मुकुटावर भलेपणानें शोभत आहेत-(१८)

"अ"कार चरण युगुल-"उ"कार उदर विशाल-"म"कार महामंडल-मस्तकाकारें-(१९)

ही तिन्ही एकवटलेले तेथें सारें शब्दब्रह्म-वेद ते आकळिले कवळिले, तें आदिबीज म्यां गुरुकृपेनेंच नमिलें वंदिलें-(२०)

**आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यकळा कामिनी ।**
**ते शारदा विश्वमोहिनी । नमस्कारिली मियां ॥ २१ ॥**

**मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलो हा संसारपुरु ।**
**म्हणोनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥**

**जैसें डोळया अंजन भेटे । ते व्हेळीं दृष्टीसि फांटा फुटे ।**
**मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥**

**कां चिंतामणि आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।**
**तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ॥ २४ ॥**

**म्हणोनि जाणितेनि गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।**
**जैसें मूळसिंचनें सहजें । निगती शाखापल्लव ॥ २५ ॥**

**कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडतिं समुद्रावगाहनीं ।**
**ना तरि अमृतरसस्वादनीं । रस सकळ ॥ २६ ॥**

तैसा पुढत पुढति तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।
जो अभिलसित मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥

आता अवधारा कथा गहन । जें कळां कौतुकां जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ २८ ॥

ना तरि सर्व सुखाची आदि । जे प्रमेय महानिधी ।
नाना नवरस सुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥

कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्रजाता वसौट । अशेषाचें ॥ ३० ॥

ना तरि सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥

नाना कथारूपें भारती । प्रगटली असे त्रिजगती ।
आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥

म्हणौनि हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो ।
येथूनि रसा आला आवो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥

तेवींचि आईका आणिक एक । एथोनि शब्दश्री सच्छास्त्रिक ।
आणि महाबोधी कोंवळिक । दुणावली ॥ ३४ ॥

येथ चातुर्य शहाणें झालें । प्रमेय (प्रेम) रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोंखलें । सुखाचें येथ ॥ ३५ ॥

येथ माधुर्या मधुरता । शृंगारा सुरेखता ।
रूढपण उचिता । दिसले भले ॥ ३६ ॥

एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रताप आगळा ।
म्हणौनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥

आणि पाहाता नावेक । रंगी सुरंगतेची आगळिक ।
गुणा सगुणपणाचें बिक । बहुवस एथें ॥ ३८ ॥

भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळले ।
तैसें व्यासमति कवळलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥

कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलिया परि विस्तारलें ।
तैसें भारती सुरवाडलें । अर्थजात ॥ ४० ॥

ना तरि नगरांतरि वसिजे । तरी नागरचि होईजे ।
तैसें व्यासोक्ति तेजें । धवळलें सकळ ॥ ४१ ॥

कां प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळीं ।
प्रगटे जैसी आगळी । अंगना अंगी ॥ ४२ ॥

ना तरि उद्यानीं माधवी घडे । तैं वनशोभेची खाणी उघडे ।
आदिलापासौनि अपाडे । जियां परी ॥ ४३ ॥

नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण ।
मग अळंकारी बरवेंपण । निवाड दावी ॥ ४४ ॥

तैसें व्यासोक्ति अलंकारले । आवडे तें बरव पातले ।
ते जाणोनि काई आश्रायिले । इतिहसी ॥ ४५ ॥

नाना पुरतिये प्रतिष्ठेलागी । सानीव धरूनि अंगी ।
पुराणें आख्यानें जगीं । भारता आली ॥ ४६ ॥

म्हणोनि भारती जें नाहीं । तें नसेचि लोकां तिही ।
या कारणें म्हणिपे पाही । व्यासोच्छिष्ट जगत्त्रय ॥ ४७ ॥

अभिनव वाग्विलासिनी = आतां वाचेच्या ठिकाणीं अलौकिक चमत्कार करून दाखविणारी, अपूर्व वाचावैभव प्रगटविणारी. जे चातुर्यकळा कामिनी—चातुर्यार्थ कलाकामिनी = चौदा विद्या, चौसष्ट कलांमध्यें प्रवीण, तसेंच चातुर्य आणि कला ह्यांची स्वामिनी. ते शारदा विश्वमोहिनी नमस्कारिली मियां = ती विश्वमोहिनी जी श्रीशारदादेवी सरस्वती तिला माझें वंदन असो. चतुर = हुशार, सुंदर, शीघ्र. कामिन् = चंद्र, विषयासक्त, प्रेम इच्छिणारी, कामातुर, प्रेमळ, सुंदर स्त्री (भित्री स्त्री). कामिनी = योषित्, विलासिनी. कामिनी = कोपशीलायाः २. कोपना, भामिनी. विशेषाः स्त्री भेदाः = अंगना, भीरू, कामिनी, वामलोचना, प्रमदा, मानिनी, कान्ता, ललना, नितम्बिनी, सुंदरी, रमणी, रामा इति १२ गुणैः उत्कृष्टायाः स्त्रिया = वरारोहा, मत्तका नी, उत्तमा वरवर्णिनी (२१). म्हणोनि—म्हणउनि. तारिलो = तरून गेलों, पोहून गेलों. अत्यादरू = अतिप्रेम, अतिसत्कार. विवेकावरी = समंजसपणामध्यें, वैराग्याचे ठायीं (२२). अंजन = नेत्रांत घालण्याचें औषध, काजळ, अंजन. दृष्टीसि फांटा फुटे = अवलोकनशक्तीस, नेत्रांस, बुद्धीस एक निराळाच फांटा फुटतो, उगवतो. वास पाहिजे तेथ प्रगटे महानिधी = पाहिजे त्या ठिकाणीं निधान, खजिना स्पष्ट होतो, व्यक्त होतो. महानिधी = ठेवा. वास = वाट, मार्ग (२३). चिंतामणि हातीं आलिया = इच्छिलेलें देणारें रत्न—गणपति जर हातचा झाला—हातींच आला. मनोरथी विजयवृत्ति = मनोरथ—इच्छा त्वरिततेनें पूर्ण होणारी होत. मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति = श्रीलक्ष्मीची इच्छा पूर्ण केलेली (२४). जाणितेनि—जाणतेने. निगती शाखा पल्लव—शाखापल्लव संतोषती. जाणतेन = शहाण्यानें. कृतकार्य = संतुष्ट, चतुर (कृतकृत्य). मूळसिंचनें सहजें = मूळ बुंधातळीं पाणी घालण्यानें, ओलें करण्यानें (२५). समुद्रावगाहनीं = समुद्रस्नानानें. अमृतरसस्वादनीं रस सकळ = सुधेची गोडी, स्वादिष्टपणा तेथें सर्व रस असणारे—नवरसांपैकीं प्रत्येक. (रस = शब्द करणेंच एक सर्व तेथें) (२६).

वंदिला—अभिवंदिला = नमिला, नमस्कारिला, पूजिला. अभिलसित मनोरुचि पुरविता तो = इच्छित, इच्छा, मर्जी, खुषी पुरविणारा तो (२७). कळा कौतुकां—सकळ कथा. अभिनव उद्यान विवेकतरूचें = विवेकवृक्षाचें अपूर्व वन (२८). प्रमेय = तत्त्वार्थ, सिद्धांत. नवरस सुधाब्धि = नउही रसांची गोडी, नउही रसांच्या गोडीचा समुद्र. परिपूर्ण हे = भरलेला, तृप्त (२९). परमधाम प्रकट = श्रेष्ठ धाम, गृहस्थाचे देह तेज व्यक्त, स्पष्ट. मूळपीठ = मूळ कारण, आसन, पाया, तळ, देवाचें सिंहासन. वसौट = आश्रय. अशेषाचें = सर्व, समग्र, अनंत (३०). माहेर = माहेरघर, मातृपितृ प्रेमस्थान. जिव्हार = हृदय. शारदेचें लावण्यरत्नभांडार = शारदेचेंसौंदर्यरत्न, उत्तम वस्तु, खजिना, कोठार (३१). कथारूपें भारती = सरस्वती अनेक कथांच्या रूपानें. त्रिजगतीं प्रगटली असे = तिन्ही जगीं स्पष्ट झाली आहे. व्यासाचिये महामती आविष्करोनि = महामति व्यासाच्या मतीमध्यें प्रवेशून (३२). काव्यां रावो = सर्व काव्यांचा राजा. ग्रंथ गुरुवतीचा ठावो = ग्रंथगौरव तेथीलचा ठाव, ग्रंथप्रौढीचा ठाव. रसा आवो आला—झाला—रसाळपणाचा = रसांना रसाळपणाचा आकार झाला, रसांना आकार घेऊन आहे (३३).

शब्दश्री सच्छास्त्रिक = शब्दरूपी लक्ष्मी शास्त्रीय-शास्त्रसंमत झाली. शब्दवैभव शास्त्रशुद्ध झालें. महाबोधी दुणावली कोंवळिक = आत्मबोध, कोमलपणा दुपटीचा झाला (३४). चातुर्य शहाणें झालें = चातुर्यास शहाणपण जोडलें गेलें. प्रमेय रुचीस आलें = प्रमेय, प्रेम, भक्तिरस रुचकर झाला, भक्तिरसाला रुची आली. सुखाचें सौभाग्य पोखलें = सुखसौभाग्य वृद्धिंगत झालें, पोसलें गेलें (३५). माधुर्या मधुरता = माधुर्य गोड झालें. शृंगारा सुरेखता = शृंगाराला सुरेखपणाची जोड लाधली. रूढपण उचिता = योग्य वस्तूस. दिसले भले = श्रेष्ठपणा मिळाला (३६). कळाविदापण कळा = तेजाचा कळा तेथें कळाविदापण आलें–पुण्यासि आगळा प्रताप = पुण्याईला अपूर्व वैभव प्राप्त झालें–प्रताप आगळा असा. अवलीळा दोष हरले = सहज लीलेनेंच दोष हरण झाले (३७). नावेक = क्षणभर. रंगी आगळिक सुरंगतेची = रसरंगास–नवरसास खुलावटपणा आला विशेष असा. गुणा बहुवस बिक सगुणपणाचें = गुणांना सगुणपणाचें तेज पुष्कळसें प्राप्त झालें (३८). कवळलें विश्व मिरवें = व्यासाच्या सर्वव्यापक बुद्धीनें प्रकाशित केलेलें विश्व शोभत आहे–सूर्यतेजाप्रमाणें प्रकाशित झालें आहे (३९). सुक्षेत्रीं बीज घातलें = उत्तम क्षेत्रीं बीज पेरलें. विस्तारलें = आपआपल्यापरीनें विशालता–विस्तार पावलें. भारती सुरवाडलें अर्थजात = भारतांत सर्व विषय शोभिवंत झाले आहेत (४०). नागरचि होईजे = बहुश्रुत व शिष्ट होतो. व्यासोक्ति तेजें सकळ धवळलें = व्यासाच्या वाणीमुळें सारें जग ज्ञानमय झालें आहे (४१). प्रथम वयसाकाळी लावण्याची नव्हाळीं अंगना अंगी आगळी प्रगटे = तारुण्यात स्त्रीची लावण्यशोभा खुलून दिसते–आगळी अशी प्रगट–स्पष्ट दिसते (४२). उद्यानीं माधवी घडे = बागेमध्यें वसंताची शोभा आली–वसंतऋतूमध्यें. वन(श्रीयेची) शोभेची खाणी उघडे = वनश्री शोभा (चित् खनि) शोभेची खाणीच उघडली होते. झाडाझुडपावर वनश्रीचे भांडार खुलें झालेलें दिसतें. आदिला-पासौनि अपाडे = पहिल्यापेक्षाहि अधिक अशी (४३). न्याहाळिता साधारण = सहजपणें निरखून पाहिलें तों. बरवेंपण निवाड दावी = सोन्याला विशेष शोभा आली (४४). आवडे तें बरव पावले = आवडलें तें शोभा पावलें. इतिहसी आश्रायिले = इतिहास पुराणांनीं त्याच बाणीचा आश्रय केला (४५). पुरतिये प्रतिष्ठेलागी = प्राणप्रतिष्ठा ती पुरति व्हावी म्हणून. सानीव धरूनि अंगी = लहानपणच एक अंगीं धरून (४६). व्यासोच्छिष्ट जगत्त्रय = भारतांत नाहीं तें त्रैलोक्यात नाहीं–तिन्ही जगीं व्यासाचें उच्छिष्ट. व्यास = पराशरास सत्यवतीपासून कौमार्यावस्थेंत झालेला पुत्र, वेदविभागकर्ता, महाभारतकर्ता, याच्यापासूनचा जो विचित्रविर्य त्याच्या स्त्रियांस धृतराष्ट्र व पांडु झाले व अंबिकेच्या दासीस विदुर झाला. यास द्वैपायन, कृष्णद्वैपायन अशींही नांवें आहेत. उच्छिष्ट = उष्टा, टाकलेला, टाकून दिलेलें. उपभुक्त, जेवल्यावर हाततोंड न धुतलेला, अपवित्र, उष्टें, शिळें. १) उष्टें अन्न. २) मध. ३) दूध. जगत्त्रय = स्वर्ग, पृथ्वी, पाताळ (४७).

आतां अभिनव आदि नवीन, तरुण अशी वाणीनें प्रेमविलास क्रीडाशील, वाक् विलासिनी जी चातुर्याची, कौशल्याची, सौंदर्याची मूर्तिमंत कामिनीरूपी कळाच, ती विश्वमोहिनी शारदा (=कोजागिरी) श्वेतपद्मा मी नमस्कारिली–वंदिली–(२१)

माझ्या हृदयामध्यें सद्गुरु–त्यांनीं हा संसारपूर पोहून जाऊन मजला तारिलें, सांभाळिलें; आणि म्हणूनच कीं विवेकावर तर माझी सर्वच सर्व मिस्त–अत्यादराची अशी विशेषतेनें असलेली–(२२)

डोळ्यांना अंजन भेटावें जसें तसें श्रीगुरु भेटले म्हणावेत जेव्हां तेव्हां तर ह्या दृष्टीसच एक नवीन डोळारूपी फांटा येऊन आहे, तेथें मग जेथें पाहिले तेथें महानिधीच कीं एक प्रगट, स्पष्ट, व्यक्त होणारा ना! (२३)

अहो, हातीं जर सर्व मनोरथ पुरविणारा मणि आला, तो तर देवच कीं गणपति जसा–नेहमींच कीं मनोरथ हे विजयी होणारे; तसा मी मनोरथ पूर्ण करणारे–श्रीनिवृत्तीच कीं–परिपूर्णकाम असा; असें श्रीज्ञानदेव म्हणतात–(२४)

या कारणास्तव आपल्यानें गुरु सेवावेत, त्यायोगेंच मग कृतकृत्य व्हावें, कार्यामध्यें यश यावें, जसें का वृक्षाचें मूळ सिंचन केलें असतां शाखापानें इत्यादि फुटणारीं निघणारीं ना! (२५)

ह्या त्रिभुवनामधीलची सर्व तीर्थें जीं कांहीं तीं तर एका समुद्रस्नानानेंच सहज पदरांत पडणारीं होतात; अथवा अमृत रसास्वाद घेतला तर सर्वच्या सर्व रस तेथें भेटणारे होतात–ज्याप्रमाणें–(२६)

त्याप्रमाणे पुन्हा पुन्हा वारंवार श्रीगुरूच कीं म्यां सेविला–नमस्कारिले, वंदिले जे का ईप्सित–मनोरथ पुरविणारे केव्हांहि कीं ते! (२७)

आतां गहन अशी कथा अवधारण्याचें–ऐकण्याचें करावें–जी का अनेकविध कलांना तसेंच कौतुकांना जन्म देणारी अशी आहे. अहो! विवेकतरूचे–वृक्षाचे अपूर्व असें वन, बाग–(२८)

सर्व सुखाची आदि अशी सिद्धान्तरूपी महानिधी नऊही रसांच्या गोडीचा तृप्त असा भरलेला समुद्रच एक! (२९)

परमश्रेष्ठ असें धाम, गृहस्थांचें तेज व्यक्त स्पष्ट असें प्रगट, सर्व विद्यांचा पाया, देवाचें सिंहासन, मूळ कारण, आसन; शास्त्रजात जेवढें म्हणून आहे तेवढ्या सर्वाला, समग्राला आश्रयाचें होणारें असें हें श्रेष्ठ धाम प्रगट झालेलें असें! (३०)

अथवा सकळ धर्मांचे माहेरघर, सज्जनांचें हृदय, शारदेचें सौंदर्य, रत्न, उत्तम वस्तु, खजिना, कोठार.(३१)

महामति व्यासाच्या मतीमध्यें शिरून–सरस्वती ही अनेक कथांच्या रूपानें तिन्हीं जगीं प्रगट, स्पष्ट झाली आहे. (३२)

म्हणून हा सर्व काव्यांचा राजा होय–ग्रंथांच्या गौरवाचा ठाव होय, ग्रंथप्रौढीचा मानमरातब ह्यासच मिळून आहे–इथूनच रसांना रसाळपणाचा आकार येऊन आहे–(३३)

त्याप्रमाणें आणीकही कांहीं ऐका! जे का–इथूनच शब्दरूपी लक्ष्मी शास्त्रीय झाली, शास्त्रसंमत अशी झाली–शब्दवैभव शास्त्रशुद्ध झालें–आत्मबोध कोमलता दुपटीची झाली आहे–(३४)

इथें चातुर्यास शहाणपण जोडलें गेलें–चतुराई ही कुठें जर जगामध्यें असेल तर ती चतुराई, तें चातुर्य, महाभारतामध्येंच पाहावयास मिळालें, त्यामुळें जगामध्यें चहूंकडे चतुरता चतुरता म्हणून जी आहे ती प्रगट झाली–प्रमेयसिद्धान्त चवदार झाले; प्रमेय, प्रेम, भक्तिरस रुचकर झाला–भक्तिरसाला रुचि आली, सुखाचें सौभाग्य सुदैव असें पुष्ट झालें–सुख व सौभाग्य वृद्धिंगत झालें, पोसलें गेलें–(३५)

माधुर्य गोड झालें, शृंगाराला सुरेखपणाची जोड लाभली, योग्य वस्तूस श्रेष्ठपणा मिळाला–माधुर्य जें जगामध्यें आहे, त्याला मधुरता आली, त्याचप्रमाणें शृंगाराला सुरेखता येऊन उचित गोष्टीला रूढपणा दिसून आला–(३६)

तेजाचा, सौंदर्याचा, सगुणाचा कळा तेथें कळाविदपण आलें–कलावेत्ते जेवढे म्हणून आहेत, त्यांची कला येथेंच दिसते. पुण्य जगांत आहे, पण इथला प्रताप कांहीं आगळा असा–वेगळा प्रकार ज्यांत आहे असा –म्हणून सहजासहजींच जनमेजयाचे दोष हरले–पुण्याईला अपूर्व वैभव प्राप्त झालें, तेथचा प्रताप आगळा असा –त्यामुळें दोष सहज लीलेनेंच हरण झाले–(३७)

क्षणभर पाहिलें तर नवरसास, रसरंगास विशेष असा खुलावटपणा आला–गुणांना सगुणपणाचें तेज, पुष्कळसें असें प्राप्त झालें–रंगामध्यें सरंगतेची आगळिक येथेंच दिसते–रंगभरणी शब्दांची जी रसामध्यें जाते तो रंग; तेथें आगळिक अशा गुणपणाची बी बिक येथें जास्त अशी उत्पन्न झालेली आहे–"जगन्नाथरायाचे जे रस गंगालहरीचे ते भारताच्या अनुशासन पर्वामध्यें आहेत, तेथून कीं ती अमोल अशी नच आकळणारी ती 'रसोवैसः' चे ऐश्वर्य."–(३८)

व्यासाच्या सर्वव्यापक बुद्धीनें प्रकाशित केलेलें विश्व शोभत आहे–सूर्यतेजाप्रमाणें प्रकाशित झालें आहे–जगामध्यें जिकडे तिकडे व्यासमति गुण शब्दरचना, व्याख्यान देण्याची पद्धत वगैरे ही सर्व त्यांचीच म्हणजे व्यासांचीच आहे–(३९)

उत्तम क्षेत्रीं बीज पेरिलें, तें आपआपल्या परीनें विस्तार पावलें–विशालता पावलें. त्याप्रमाणें भारतांत सर्व विषय शोभिवंत झाले आहेत–(४०)

शहरामध्यें–नगरामध्यें राहिल्यानें मनुष्य बहुश्रुत असा सर्वश्रेष्ठ होतो, तसें व्यासाच्या वाणीमुळें सारें जग ज्ञानमय झालें आहे–(४१)

तारुण्यांत स्त्रीचें लावण्य खुलून दिसतें–आगळी अशी प्रगट स्पष्ट ती शोभा लावण्याची ती दिसते–(४२)

बागेमध्यें वसंताची शोभा आली–वनश्रीशोभा चित्खणि खाणीच उघडते–पहिल्यापेक्षांहि अधिक अशी शोभा झाडाझुडुपांवर–वनश्रीचें भांडार खुलें झालेलें दिसतें–(४३)

सहज निरखून पाहिलें तर घनीभूत म्हणजे सोनियाच्या (चिपा) चीपा साधारणच दिसतात–पण अलंकार घडल्यावर एकापेक्षां एक वरचढ असें ते बरवेंपण त्याच्या ठिकाणीं दिसतें. जसें तेथें सोन्याला विशेष शोभा आली होते, तसें त्या चीपेमध्यें दिसत नाहीं–(४४)

तसें व्यासोक्तीनें अलंकारलेले, आवडे ते बरव पावले–ज्यास जें आवडतें तेंच कीं उत्तमत्वास आणलें गेलें,–आणि म्हणूनच कीं इतिहासानें त्याच व्यासवाणीचा आश्रय केला–(४५)

प्रतिष्ठा पुरती व्हावी म्हणून लहानपणच एक अंगिकारिलें–आपल्याला कशाला मोठेपणा पाहिजे असें पुराणांनीं लक्षांत घेऊन, स्वतः कमीपणा पत्करून, पुरती ती प्रतिष्ठा व्हावी म्हणून हीं व्याख्यानें भारतामध्यें आलीं–एकटें राहून कोण आपणास विचारणार, असें पुराणांनीं पाहून त्यांनीं भारताचा आश्रय केला–(४६)

म्हणून भारतांत नाहीं तें त्रैलोक्यांत नाहीं, अशी म्हण प्रचारांत आली, आणि म्हणूनच कीं जाण कीं जगत्त्रय हीं व्यासउच्छिष्टेंच होत–(४७)

**ऐसी सुरस जगीं कथा । जे जन्मभूमि परमार्थां ।**
**मुनी सांगे नृपनाथा । जन्मेजया ॥ ४८ ॥**

**जे अद्वितीय उत्तम । पवित्र जे कां निरोपम ।**
**परम मंगल धाम । अवधारिजो ॥ ४९ ॥**

**आतां भारत कमळपरागु । गीताख्य प्रसंगु ।**
**जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसी ॥ ५० ॥**

**ना तरि शब्द ब्रह्माब्धि । मथियला (मथिला) व्यास बुद्धि ।**
**निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥**

**मग ज्ञानाग्नि संपर्कें । कडसिलें विवेकें ।**
**पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ ५२ ॥**

**जे अपेक्षिजे विरक्ति । अनुभविजे संतीं ।**
**सोहंभावें परागति । रमिजे जेथें ॥ ५३ ॥**

**जें आकर्णिजे भक्तिं । आद्य वंद्य त्रिजगती ।**
**ते भीष्मपर्वीं संगति । सांगिजैल ॥ ५४ ॥**

**जे भगवद्गीता म्हणिजे । जे ब्रह्मेशानी प्रशंसिजे ।**
**सनकादिकी सेविजे । आदरेसी ॥ ५५ ॥**

**जैसे शारदियेचे चंद्रकळे- । माजी अमृतकण कोवळे ।**
**ते सेविती मनोमवाळे । चकोरतल्गे ॥ ५६ ॥**

सुरस = गोड, स्वादिष्ट. जे-ते. परमार्थ = आत्मज्ञान, खरेपणा, श्रेष्ठ वस्तु. मुनी = तपस्वी, ऋषी, साताची संख्या. कथा = गोष्ट, इतिहास. जगी = लोकीं, जगीं. जन्मभूमि = अस्तित्वाची, उत्पत्तीची, प्राण्याची, आमरणाची जन्मभूमि(-मी), पृथ्वी, जमीन = परमार्थाचें मूळस्थान असलेली. ऐसी सुरस जगी कथा-ऐसी जगी सुरस कथा. जन्मेजय (जनमेजय)-अर्जुनपुत्र अभिमन्यूचा नातू, याचा पिता परीक्षिती राजा सर्पदंशानें मृत झाल्यामुळें, यानें उत्तंक ऋषीच्या उत्तेजनावरून सर्पसत्र केलें. त्यात निरनिराळ्या जातींचे हजारों सर्प दग्ध झाले. नंतर आस्तिक ऋषीनें येऊन तें सत्र बंद करविलें. मुनि वैशंपायन (वैशंपायन = ऋषिविशेष-याज्ञवल्क्याचा मामा व गुरु, व्यासाचा एक प्रख्यात शिष्य. हा पुराणें सांगण्यांत फार निपुण होता. यानें जनमेजयास महाभारत सांगितलें-एकदां याज्ञवल्क्यावर रागावून यानें त्यास यजुर्वेद ओकण्यास लाविलें-तो इतर शिष्यांनीं तित्तिर पक्ष्यांच्या रूपांनीं चिंतला-तीच तैत्तिरीय शाखा होय.) शुकाचार्य-व्यासपुत्र; शुकीचें रूप धरलेल्या घृताची नामक अप्सरेला पाहून व्यासाचें रेतस्खलन झालें, त्यापासून हा झाला. हा शुकाचार्य जन्मतःच तत्त्वज्ञानी होता व आजन्म ब्रह्मचारी होता. रंभा नांवाच्या अप्सरेनें यास मोहित करण्यासाठीं केलेले श्रम व्यर्थ गेले. व्यासानीं यास भागवत पढविलें व त्यानें तें परीक्षितीस सांगितलें. (शुक नांवाचा रावणाचा एक मंत्रीही होता) (४८).

पवित्र जे कां निरोपम-पवित्रैक निरुपम = पुण्यशील व तुलनारहित अशी निरुपम. मंगल धाम-मंगळ धाम. अद्वितीय = दुसरी नव्हे अशी-परमार्थाचें मूळस्थान-पहिलीच कथा तेथ. परम मंगल धाम = श्रेष्ठ अशी शुभकारक, मंगल, कल्याणकारक (४९). भारत कमळपरागु = भारतकथारूपी निकोप कमलाचा पुष्परेणु. गीताख्य प्रसंगु = गीता नांवाचा समय-संयोग (५०). शब्दब्रह्माब्धि = शब्दब्रह्म; वेदरूपी समुद्र. मथिला-मथियला व्यासबुद्धि = व्यासबुद्धीच्या विचारांनीं घुसळिलेला. निरवधि = निस्सीमतेनें. नवनीत = ताजें लोणी (५१). मन-मग. ज्ञानाग्नि संपर्कें। कडसिलें विवेकें। पद आलें परिपाकें। आमोदासी = ज्ञानरूपी अग्नीनें कढ येईतों कढविलें, त्याचें हें गीतारूप सुगंधमय तूप तयार झालें (५२). जे अपेक्षिजे विरक्ति = जें वैराग्यवंतांनीं-निरिच्छ जे आहेत त्यांनीं-इच्छेचें, जरूरीचें करावें. सोहंभावें = तो परमात्मा मीच या भावानें, तेथेंच रममाण होऊन असतात. परागति अनुभविजे संति = संत तिचा अनुभव घेतात (५३). आकर्णिजे भक्ति = भक्त तिचें श्रवण करितात. आद्य वंद्य त्रिजगति = आद्य असें त्रिजगीं वंद्य. भीष्मपर्वीं संगति सांगिजैल = भारतामधील भीष्मपर्वाच्या अनुरोधानें सांगितली जाईल (५४). ब्रह्मेशानी प्रशंसिजे = ब्रह्मा व ईशान यांनी प्रशंसावी. सनकादिकी सेविजे = सनक सनंदनादींनी अति आदराने सेवावी (५५). शारदियेचे चंद्रकळे-चकोर तल्गे = शरद ऋतूंतील चंद्रकला जी तिज मधील कोवळे अमृतकण ते चकोराच्या पिलांनी मनाच्या मवाळपणें करूनच कीं सेविले होतात (५६).

अशी गोड स्वादिष्ट अशी कथा, ह्या जगामध्यें जी परमार्थाचे मूळस्थान असलेली, ती वैशंपायन मुनी जनमेजय नृपास सांगत आहेत. आहारनिद्रा मैथुन हे सामान्य होत पण-(परमार्थ) कोणत्या मार्गानें जावे हे समजते म्हणून हा ग्रंथ परमार्थाची जन्मभूमि होय-(४८)

जी कथा अद्वितीय अशी; तिच्या तोडीची अशी दुसरी कथा नाहीं. जी पुण्यशील व तुलनारहित अशी निरुपम ती श्रेष्ठ अशी शुभकारक मंगल कल्याणकारक अशी जी ती ऐकावी-(४९)

भारतरूपी कमलाचा निकोप पुष्परेणु पराग तेथें गीता नावाचा समय-संयोग तो श्रीरंग, बहुत अशा आदराने की अर्जुनाशी संवादला, बोलला आहे. व्यास आणि समास–व्यासानी वेदांचा वेगळा भाग करून दाखविला अशी त्यांची मति लोकोत्तर नसती तर त्याना ते शक्य झालें नसते–(५०)

शब्दब्रह्म वेदरूपी समुद्र व्यासाच्या विचाररूपी बुद्धिनें मथियेला आहे. घुसळिलेला आहे, त्यामधून हे निस्सीम असे अमर्याद अनुपम नवनीत ताजें लोणी काढलेले–(५१)

मग मन हे ज्ञानरूपी अग्नि विवेक विचारानें, संपर्कानें कढ येईतो कढविले. त्याचेच गीतारूप आनंद सुगंधमय असें तूप तयार झाले. तेथचा सुवास किती म्हणून सांगावा–घमघमाट सुटतो ज्याचा असा–आमोदाला स्थान आले–आमोद तेथें राहाण्यास आला–(५२)

जे वैराग्यवंतानी, निरिच्छ जे आहेत त्यांनी इच्छावे व जरुरीचे करावे. तो परमात्मा मीच या सोहंभावाने तेथेंच रममाण होऊन असावें. विरक्तिनें अपेक्षा केली जाते, संतांनी तिचा अनुभव घेतला होतो. सोहंभाव तो मी आहे अशा श्रेष्ठ ज्ञानाने परागति तेथें रममाण व्हावे–(५३)

भक्ति आकर्णिजे, भक्तिनें ऐकावी, त्रैलोक्यामध्यें जे वंद्य त्यामध्येंहि हे पहिले वंद्य–वंद्य असे आहे. भक्त तिचे श्रवण करतात–ते तिन्हि जगामध्यें आद्य असे असल्यानें वंद्य होय–ते भारतामधील भीष्मपर्वाच्या अनुरोधाने संगति घेऊन सांगण्याचे करूं–(५४)

भगवद्गीता–भगवंताच्या गुणांचे वर्णन केलेले असें गीत–ती भगवद्गीता म्हटली जी ब्रह्मदेवांनी व शंकरांनी–सत्य व शिवलोकांनी तिची वाहवा करावी, ती प्रशंसावी, सनकादिकांनी अति आदरानें सेवावी, सेवन करावी–(५५)

शरदऋतूमधील चंद्राच्या कलामधील कोवळे कोवळे अमृतकण असतात, ते चकोराच्या पिलांनी –ज्यांना अद्याप चोंचीचा कणखरपणा आलेला नाहीं अशा पिलांनी ते सेवन करण्याचे करितात जे का–(५६)

तियापरी श्रोतां। अनुभवावी हे कथा।
हळुवारपण चित्ता। आणुनिया॥ ५७॥

हे शब्देविण संवादिजे। इंद्रिया नेणता भोगिजे।
बोला आधि झोंबिजे। प्रमेयासीचि॥ ५८॥

जैसें भ्रमर पराग नेती। परि कमळदळें नेणती।
तैसी परी आहे सेविती। ग्रंथीं इये॥ ५९॥

कीं आपुला ठावो न सांडिता। आलिंगिजे चंद्र प्रगटता।
हा अनुराग भोगिता। कुमुदिनी जाणे॥ ६०॥

ऐसेनि गंभीरपणें। स्थिरावलेनि अंतःकरणें।
आथिला तो जाणे। मातु येथिची॥ ६१॥

अहो अर्जुनाचिये पांति। जे परिसणेया योग्य होती।
तिहीं कृपा करूनी संतीं। अवधान दीजे॥ ६२॥

हें सलगी मियां म्हणितले। चरणा लागौनि विनविलें।
प्रभु सखोल हृदय आपुलें। म्हणौनिया॥ ६३॥

श्रोतां अनुभवावी हे कथा चित्ता हळुवारपण आणुनिया = चित्तास हळुवारपण आणून श्रोत्यांनी ही कथा अनुभविण्याचे करावे (५७). शब्देविण संवादिजे = शब्दाशिवायच ही संवादाची-बोलण्याची करावी. इंद्रिया नेणता भोगिजे = इंद्रियांना समजल्याशिवाय ही कथा भोगावी. प्रमेयासी बोला आधि झोंबिजे = सिद्धांत हे बोलास येण्याचे अगोदरच मुळीं त्याना-प्रेमाला-सिद्धांताला झोंबण्याचें करावे (५८). भ्रमर पुष्परेणु पराग नेतात, पण कमळाची दळे ते कांहिं नेणत जाणत नाहींत. तशी तऱ्हा ह्या ग्रंथाच्या सेवन करण्यामध्यें आहे. गीता अद्वैत तत्त्व आहे तेव्हां त्या अद्वैत तत्त्वाला कोण नेते ते-भुंग पराग नेतात पण कमळें ते नेणतात-काय येकंदर होत आहे, याची कल्पनाही होत नाहीं (५९). आपला ठावो न सांडिता = आपलें ठिकाण नच सोडता. चंद्र प्रगटता आलिंगिजे हा अनुराग भोगिता कुमुदिनी जाणे = चंद्र उगवलेला तो आलिंगावा कसा तर जशी ती कुमुदिनी जशी तो अनुराग तांबडेपणा-प्रीति भोगणारी ती जाणते (६०). गंभीरपणे = खोलीने, दाटपणें व स्थिर अंतःकरणाने आहे तो येथची गोष्ट जाणूं शकतो (६१). अर्जुनाचिये पांति, जे परिसणेया योग्य होती = अर्जुनाच्या पंक्तीस बसलेले जे संत; जे ही कथा ऐकण्याचे योग्यतेचे आहेत, त्यांनी अवधान-लक्ष देण्याचे करावे (६२). सलगी = आपणाजवळचे होऊन, आपणाशी सलगी करून मी हे म्हटले. चरणा लागौनि विनविले = आपल्या चरणास लागून, झोंबून, पायां पडून, मी हें विनविण्याचे केले. सखोल हृदय आपुलें म्हणौनिया (म्हणउनिया) = आपलें हृदय, हे प्रभु, उदार आहे, व मी आपलें लेंकरू आहे (६३).

त्याप्रमाणें श्रोत्यांनी ही कथा अनुभवावी. चित्ताचा चंचळपणा काढून टाकून, चित्तास हळुवारपण आणून कीं-दृष्टांतहीपण, जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे अशा विनोदाचे-(५७)

ही कथा शब्दाशिवायच संवादाची केली होते-तोंडानें उच्चार केल्यावाचून ही कथा सांगता येते-इंद्रियांना न कळताच ती अनुभवास येते-अनुभवण्याचे-भोगण्याचे करावे-प्रेमसिद्धांत प्रमेयाचे बोलास येण्याचे अगोदरच मुळीं त्या प्रेमाला, सिद्धांताला चिकटण्याचें झोंबण्याचे करावें. सिद्धांत हा नंतर तयार होणारा. सूत्रशाकट न्याय-सूत्राचा शेला हा केव्हां होणार-शाकट, शेला हा होण्याच्या अगोदरच मुळीं तो शब्द त्या सूत्राला चिकटतो. भोग हा त्रिपुटीरहित आहे. इंद्रियें हीं त्रिपुटी मागतात. इंद्रिये परांचिखानि म्हणजे पराङ्मुख आहेत. ती प्रायच्मुख होत नाहीत, म्हणून इंद्रियांना नच दाखविता म्हणजे चोरून खाल्ले पाहिजे. येथें शब्दाचे कांहींहि चालत नाही-शब्द आणि अर्थ-असे या अर्थापासूनच शब्द तयार होणारा, म्हणून तेथें शब्दाशिवायच मौन धरून बोलावे, संवादावे-(५८)

ज्याप्रमाणें भ्रमर (मन) पुष्पामधील रेणु नेतात, पण पुष्पें कमलें ती कांहीं जाणत नाहींत-ते त्यांना समजतही मुळींच नाहीं-तशी तऱ्हा ह्या ग्रंथामध्यें जो विषय दिला आहे त्यास सेवण्याची अनुभवण्याची ती तऱ्हा-रीति आहे. (५९)

आपला ठाव ठिकाण नच सोडता चंद्र उगवला, चंद्र प्रकट झाला, तेथच्या त्या प्रीतिस, तांबडेपणास-भोगण्याचे तें कसे ते एकटी कुमुदिनीच जाणते. (६०)

अशा गंभीरपणानें, दाटपणानें, स्थिर अशा अंतःकरणानें खोलीचे जो आहे, तोच कीं अहो, येथची गोष्ट ती जाणूं शकतो. (६१)

अर्जुनाच्या पंक्तीचेच कीं जे श्रवण करण्याचे योग्यतेने आहेत, त्यांनीं संत सज्जनांनीं कृपा करून आपलें लक्ष-अवधान येथें देण्याचें करावें. (६२)

हे आपल्याशी सलगी करून मी म्हटले-आपल्या पायास लागून मी विनविलें, कारण काय तर, हे प्रभू आपलें हृदय बहु उदार असें आहे म्हणून कीं-(६३)

जैसा स्वभाव मायबापाचा । अपत्य जरि बोले बोबडिया वाचा ।
तरि अधिकचि तयाचा । संतोष वाटे ॥ ६४ ॥

तैसा तुम्हि अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला ।
तरि उणें सहजें उपसाहला । प्रार्थु कायि ॥ ६५ ॥

परि अपराध तो आणीक येक आहे । जे मी गीतार्थ कवळुं पाहे ।
ते अवधारा विनवूं लाहे । म्हणौनिया ॥ ६६ ॥

हे अनावर न विचारितां । वायाचि धिंवसा उपनला चित्ता ।
येऱ्हवि भानुतेजै काइ खद्योता । शोभा आथि ॥ ६७ ॥

कां टिट्टिभु चांचुवरी । माप सुये सागरि ।
मी नेणु तयापरी । प्रवर्ते येथ ॥ ६८ ॥

ऐका आकाश गवसावें । वरि आणीक तयाहुनि थोर होआवें ।
म्हणौनि अपाड हे अवघे । निर्धारिता ॥ ६९ ॥

मायबापाचा स्वभाव अपत्य जरि बोले बोबडिया वाचा=मायबापाचा स्वभाव उदार असा, या लेकराचे बोबडे बोल ऐकून आपणास अधिकच संतोषाचे भरतें येईल (६४). उणें सहजें उपसाहला= सज्जनांनीं अंगीकार केल्यानें, सज्जनांनीं आपला म्हटल्यानें कीं उणे ते सहजच कीं पुरते होणारे व्हावे–तेथें उपसाहजे तेच कीं, पुरते कसे होईल तेथें मी काय प्रार्थना ती करावी बरे (६५). परि अपराधु तो आणीक येक आहे जे मी गीतार्थ कवळुं पाहे=गीतार्थ स्पष्ट समजून घेण्याचे मी करीत आहे, हा आणीक एक तर अपराधच कीं मी करीत आहे (६६).हे अनावर न विचारितां वायाचि धिंवसा उपनला चित्ता=ब्रह्म हे अविचारणीय पण नच विचारणे केले, तेथें एक व्यर्थंच कीं असा चित्तामध्यें धाडसाचें साहस मी करीत आहे. भानु तेजै काइ खद्योता शोभा आथि=सूर्यापुढे काजव्याचें तें मिरवणें कसचें न काय (६७). टिट्टिभु चांचुवरी माप सुये सागरी=टिटवीनें आपल्या चोंचीने समुद्र आटविण्याचा प्रयत्न करावा. मी नेणु तयापरी प्रवर्ते येथ= तसा हा माझा प्रयत्न नेणतेपणानेच कीं होत आहे (६८). आकाश गवसावें=आकाश सांपडल्याचे व्हावे तर. निर्धारितां अपाड हे=निर्धारानें पाहिलें असतां हे विलक्षण असे असाधारण होय (६९).

आईबापाचा–मायबापाचा स्वभाव आपल्या लेकराने जे कांहीं बोबडे बोल बोलिले असतील, त्यानें तर त्यांना अधिकाधिकच संतोष होणारा–(६४)

त्याप्रमाणें तुम्हीं संतानी अंगिकारलेला, सज्जनांनीं आपण आपला म्हटलेला, तेथें उणें सहजच कीं उपसाहलें व्हावेंच असें; अहो प्रार्थना येथें ती कसची बरे!–(६५)

पण अपराध तो आणीक एक आहे, जे का मी गीतेचा अर्थ आकलन करू पाहात आहे–तेथचा अर्थ कवळावा ते मी पाहात लक्षीत आहे एवढीच कीं विंनति आपणास करीत आहे, आणि म्हणूनच कीं तो अपराधच एक मानला व्हावा हें उघडच कीं–(६६)

अहो शब्द ब्रह्म का ब्रह्म हे तेथें अविचारणीयच एक, ते जर नच आकळणारे असें आहे पण माझ्या चित्ती मजला तर वायांच कीं, व्यर्थंच कीं एक हिंमत, धिटाई उपजविली होऊन आहे, येऱ्हवी सूर्यतेजापुढें द्योतकाची ती काय मातब्बरी का शोभा तरी असणार बरें! (६७)

अहो टिटवीनें आपल्या चोंचीनेच कीं समुद्र आटविण्याचे योजिले–तिचा समज कीं चोंच ही त्या मापाची का नच होणारी ती–त्याप्रमाणें मी येथें नेणु–नच जाणता, नेणताच कीं वर्तत आहे–(६८)

ऐकावें कीं आकाश हे सांपडावे गवसावे व्हावे तर त्या आकाशाहूनही निर्धारानें थोर झाले पाहिजे आणि याजकरितां हे विलक्षण असेंच असाधारण दिसत आहे कीं–(६९)

**या गीतार्थाची थोरी। स्वयें शंभु विवरी।**
**तेथें भवानी प्रश्न करी। चमत्कारोनि ॥ ७० ॥**

**तेथें हरू म्हणे नेणिजे। देवी जैसें का स्वरूप तुझें।**
**तैसें नित्य नूतन जाणिजे। गीता तत्व हें ॥ ७१ ॥**

**हा वेदार्थ सागरु। जो निद्रिस्थात्मयाचा घोरु।**
**तो स्वयें सर्वेश्वरू। अनुवादला ॥ ७२ ॥**

**ऐसें जें अगाध। जेथ वेडावले वेद।**
**तेथ मी अल्पमतिमंद। काय होय ॥ ७३ ॥**

**हे अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें।**
**गगन हें मुष्टि सुवावे। मषके केंवि ॥ ७४ ॥**

**परि येथें येकु असे आधारु। जै सानुकुळ श्रीगुरु।**
**तेणें बोले मी सधरु। ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥**

या–तया. तेथे–जेथ (७०). तेथे–तेथ. तैसे नित्य नूतन जाणिजे–तसे हे नित्य नूतन देखिजे. तत्व हे–तत्त्व (७१). सागरू–सागर. जो निद्रिस्थ आत्मयाचा घोरु–जया निद्रिताचा घोर = योगनिद्रेतल्या आदिनारायणाचें घोरणें तो हा वेद. सर्वेश्वर–श्रीसर्वेश्वर. अनुवादला–प्रत्यक्ष अनुवादला (आता बोलिजतसे आईका। हा गीता भाव निका। जो वैकुंठनायका। मुखिहुनि निघाला ॥ ११–२५ ॥) (७२). तेथ मी अल्पमतिमंद–तेथ अल्प मी मतिमंद (७३). गगन हे मुष्टि सुआवे–गगन मुष्टि सुवावे (=धरावे). केवी–केवि (७४). येथें–एथ. एकु असे आधारू–असे एक आधार. तेणेंचि–तेणे. सधरू = धैर्यानें. (परि येथ एकु असे आधारू। जै सानुकुळ श्रीगुरु। तेणें बोले मी सधरु। ज्ञानदेवो म्हणे ॥) (७५)

ह्या गीतेच्या अर्थाची थोरवी स्वतः आपण श्रीशंभु विवरण्याचे करीत असून, श्रीभवानी जगदंबा अंबा चमत्कारिली होऊन, श्रीशंभूस प्रश्न करीत आहे, ह्या गीतेच्या अर्थासंबंधी कीं–(७०)

श्रीहर तेथें म्हणूं लागले कीं, हे देवी, जसें आपलें स्वरूप नेहमीच्या नेहमीच कीं नित्य नूतन, नवे नव्हाळीचे असें, तसेंच कीं येथें हे. श्रीगीता तत्त्व नेहमींच कीं नूतनतेचे असेंच कीं जाणले जात आहे–(७१)

हा शब्दब्रह्म सागर–वेदांचा अर्थरूपी सागरच कीं एक तो जो का निद्रिस्त आत्म्याचा घोर–अहो योगनिद्रेंतल्या श्रीआदिनारायणाचे जे घोरणें तोच कीं हा वेद, तो हा श्रीसर्वेश्वर कीं, स्वतः प्रत्यक्ष अनुवादण्याचे करीत आहे–श्रीसर्वेश्वरांनी हा वानिला, गाईला आहे–(७२)

असे ते श्रीगीतातत्त्व अत्यंत गंभीर (अतलस्पर्शम्) हे अति अगाध असे आहे–अहो तेथें तर वेद हेच मुळीं वेडावले होऊन जातात, तेथें मी अल्पज्ञ, तसेंच मी अल्पमतिमंद (मंद = सौम्य, थोडे, निर्विकार) असा अल्प (=स्तोकः, अल्पः, क्षुल्लकः–क्षुल्ल, क्षुल्लक = थोडा, तुच्छ) तो कसचा न काय जाणिवेच्या दृष्टीनें कीं–(७३)

अहो (भवनदीपार असे) अपार अमर्याद असे, हे आकाश कसें बरे ते कवळामध्यें धरावे, महान तेज ते कुणास तरी धवळण्याचे करिता येईल काय–अहो महातेजास आणखी तेजाचे का अधिकतर अशा महान् महान् तेजाचे करणें ते कुणास बरे तसे करिता येईल; अहो शून्य ते गगन, जे सर्वाठायी व्यापून आहे ते मुठीमध्ये धरण्याचे करणे, ते माझ्या सारख्या मशकातें कसे ते करण्याचे–करणें होईल–(७४)

पण येथें एकमात्र आधार स्थान, माझी पात्रता ती मला दिसत आहे. तो म्हणजे जर का श्रीगुरु हे अनुकूल होतील, मला आपल्या आश्रयाचे करितील, करून आहेत, तर मात्र मी मोठ्याहूनही मोठ्या धारिष्ट्याच्या धैर्याचा होऊन आहेच आहे असें बोलणें बोलेन, असें श्रीज्ञानदेव म्हणतात-(७५)

**येऱ्हवि तरि मी मूर्ख। जरि जाला अविवेक।**
**तरी संतकृपादीपक। सोज्वळ असे॥ ७६॥**
**लोहाचे कनक होय। तें सामर्थ्य परिसी आहे।**
**कां मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धि॥ ७७॥**
**जरि प्रगटे सिद्ध सरस्वति। तरि मुकिया अेति भारति।**
**येथें वस्तु सामर्थ्य शक्ति। नवल काई॥ ७८॥**
**जयातें कामधेनु माय। तयासी अप्राप्य कांहीं आहे।**
**म्हणोनि प्रवर्तो लाहे। ग्रंथीं इये॥ ७९॥**
**तरि न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें।**
**करूनि घ्यावें हें तुमतें। विनवितसें॥ ८०॥**

जाला–जाहला (७६). परिसी–परिसीचि (७७). तरि–तन्हि. मुकिया–मुकया. अेति–आथि. येथ–एथ. कायी–काई (७८). जयाते–कां जयाते. म्हणोनि प्रवर्तो लाहे–म्हणउनि मी प्रवर्ते लाहे (=इच्छितो) (७९). सरते=सोडून देण्याचे करूं. विनवितसे–विनवीत असे. (८०)

येऱ्हवी पाहिले असता मी तर केव्हांहि, जर का अविवेक झाला तर मूर्खच कीं म्हटला जाणारा, तरी सुद्धां ते माझें मूर्खपणही केव्हांही संतकृपेच्या प्रकाशावर, दीपकत्वेंकरून सोज्वळ, अतिशुद्ध, प्रकाशमय उजळ असेंच कीं तें माझें बोलणें सडोळस असें जाणतेपणाचे होऊन जाईल ना? (७६)

रस शृंगार–शुचि; उज्ज्वलताच कीं तेथें सहचर्येनें असणारी. लोखंडाचे सुवर्ण होते जे, तेथचे ते सामर्थ्य लोखंडाचे सुवर्ण करणे जे ते परिसामध्यें आहे असें म्हटलें आहे; अथवा अमृतसिद्धि तीच कीं मृतासहीपण जीवितरूपी अमृत पाजून जिवंत करण्याचे सामर्थ्य जे तीच ती सिद्धि होय– (७७)

तेथें तर अवाक्, मूक जो का, मुका जो मुकिया जो मुकयासही कीं योग्यता ती भारतीच जशी आपल्या ऐश्वर्यास येऊन आहे असे तेथचे तें होणें होय ना (गिरी, पुरी, भारती इत्यादि) अहो तेथें तर तें परब्रह्मच मुळीं आपल्या वस्तुत्वानें सामर्थ्याचे होऊन आल्याने, तेथें बोलण्याची ती शक्ति असणें हें कसचें बरें नवल तें म्हणावे! (७८)

ज्याची मायच मूळी कामधेनू, त्यास सर्व कांहीं प्राप्त होणारे असेंच कीं–तेथें अमुक एक पदार्थ वस्तु मिळणारी नव्हे असें केव्हांहि नाही–जे जे कांहीं जेव्हां जेव्हां का मनोरथाचे होईल, ते ते तेव्हां तेव्हां केव्हांहि मिळणारे, पावणारे असेच कीं, आणि म्हणूनच कीं, ह्या ग्रंथामध्यें प्रवर्तावे असें इच्छिले–प्रवर्ततच कीं येथें मी आहे–(७९)

तरी आतां जे कांहीं न्यून–कमी भासेल, ते ते आपण पुरते करून घ्यावे असें विनवतो आहे. तसेंच अधिक जें कांहीं तें सरते करावे, सोडून द्यावे, असेही मी विनविण्याचे करीत आहे कीं अहो! (८०)

**आतां देइजें अवधान। तुम्हि बोलविला मि बोलैन।**
**जैसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र॥ ८१॥**
**तैसा मि अनुग्रहीतु। साधुचा निरोपितु।**
**ते आपला अलंकारितु। भलतया परि॥ ८२॥**

**तंव गुरू म्हणती राही । तुज बोलणें न लगे कांहीं ।**
**आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी ॥ ८३ ॥**

**या बोला निवृत्तिदासु । पावोनि परम उल्हासु ।**
**म्हणे परिसा मनावकाशु । देउनिया ॥ ८४ ॥**

दारुयंत्र = कळसूत्री बाहुले (८१). अलंकारितु–अलंकारित (८२). तुज–हे तुज न झडकरी-झडकरी वेगी (८३). पावोनि–पावुनि. मना अवकाशु देउनिया–मना अवकाश देवूनिया (८४).

येथें आतां आपण अवधान–लक्ष द्यावे, देऊन असावे–आपण तुम्हि मजला बोलविल्यास मजकडून बोलणें होईल–मी बोलेन कसें तर जसें का कळसूत्री बाहुले ते तर सूत्रधराच्या हातीच कीं, केव्हांहि तो जसे ते चेष्टविण्याचे करील तसे ते चेष्टेल, वर्तेल, ते ते व्यापार त्याचेकडून होतील कीं–(८१).

त्याप्रमाणें मी अनुग्रहाचा झालेला, साधूंनीं निरोपाचा केलेला, ते मजला पण आपला म्हटलेला, भलत्यापरीनेही अलंकाराचे करतील तसे करोत–अहो अलंकार हाच मुळीं परिधानाचा करणें, तेथें अलंकार परिधान केलेला तो तर सर्वच्या सर्व सौंदर्याचे एक आगरच कीं अशा विस्मयाचेंच कीं होणार हें केव्हांहि– तेथें भलते कोणतेही कसलेही पण ते तऱ्हेचे ते नवीन नवीनतेचे ते व्हावेच–होतें ना ! (८२)

तेथें आता श्रीगुरुंनी ते आपल्याच कीं मनींचे ते बोलणें ऐकून प्रसन्नतेस येण्याचे केले व म्हणूं लागले कीं, हे ज्ञानदेवा तुम्ही स्वस्थ असा (शांत राहा.–शांतं, शमितं, शमनं प्राप्तितस्य–शांतियुक्त जितेंद्रिय– अंतःकरणाची स्थिरता, शांति, मनोनिग्रह = शम) यावर तुम्हास आता आणीक कांहीं बोलण्याविनवण्याचे करणें नको, हे आपले विनवणें आम्हास पावले व आतां झडकरी, लगेचच्या लगेच कीं, वेगानेच कीं ग्रंथ सांगण्याचे तें करावे असे आहे.–(८३)

ह्या श्रीगुरूच्या बोलांनी निवृत्तिदास हे परम उल्हासाप्रत आले, नावीन्यच कीं दैवीचे ते त्याच्यावर परिणमू लागले व ते म्हणूं लागले कीं, मग आतां आपण मन महत् करून, मनास अवकाश तो देऊन मन मोठे करून हे परिसण्याचे, ऐकण्याचे ते करावे असें आहे कीं जी अहो ! (८४)

**धृतराष्ट्र उवाच ।**

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

[ धर्मक्षेत्रे = धर्माचे स्थान जें. कुरुक्षेत्रे = कुरुक्षेत्रामध्यें. युयुत्सवः = युद्धाच्या हेतूनें. समवेताः = एकत्र जमलेले. पाण्डवाः मामकाः च एव = पाण्डव तसेच माझे पुत्र असे ते. संजय = हे संजया ! अकुर्वत किम् = हे तेथें काय करिते झाले तें वर्तमान सांग. ]

**अन्वय :** धृतराष्ट्र उवाच, संजय, पाण्डवाः च मामका एव युयुत्सवः समन्विता धर्मक्षेत्रे च कुरुक्षेत्रे च किम् अकुर्वत ।

**अर्थ :** राजा धृतराष्ट्र संजयास म्हणाला—हे संजया, धर्माचरणास योग्य ठिकाण, धर्मक्षेत्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या कुरुक्षेत्र नांवाच्या मैदानावर युद्धाच्या इच्छेनें जमलेले माझे पुत्र कौरव तसेच पंडूचे पुत्र पांडव ते काय करिते झाले ते सांग (१).

**तरी पुत्रस्नेहे मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु ।**
**संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥**

**जे धर्मालय म्हणिजे । तेथें पाण्डव आणि माझे ।**
**गेले असती व्याजें । झुंजाचेनि ॥ ८६ ॥**

**तरि तेचि येथुला अवसरीं । काय कीजति येरयेरी ।**
**हें झडकरि कथन करि । मजप्रति ॥ ८७ ॥**

मोहितु–मोहित. संजया–म्हणे संजया (८५). तेते–जेथ (८६). तेचि–तिहि. किजति–किजत असे (८७).

पुत्रस्नेहानें मोहित झालेला धृतराष्ट्र, संजयास पुसत–विचारीत आहे कीं, हे संजया, कुरुक्षेत्रींची ती हकीकत सांगण्याचें करावें–(८५)

ज्यास धर्मालय म्हणतात, तेथें पांडव आणि माझे म्हणजे कौरव ते झुंजाच्या निमित्तानें गेले आहेत–(८६)

तरी ते हा वेळपर्यंत एकमेकांबरोबर–ते कसे व काय त्यांनीं केलें तें मजला लवकर सांगण्याचें कर–(८७)

**संजय उवाच ।**

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

[अनीकं=सैन्य. दृष्ट्वा तु=पाहतांच. व्यूढं=व्यूहाकार रचलेलें. दुर्योधन=राजा दुर्योधन. तदा=युद्धारंभवेळीं. आचार्यम्=आचार्य द्रोणास. उपसंगम्य=जवळ जाऊन. राजा=हे राजा धृतराष्ट्रा. वचनम् अब्रवीत्=पुढें सांगितलेलें बोलणें बोलला.]

**अन्वय :** हे राजा! पाण्डव अनीकं व्यूढं दृष्ट्वा तदा आचार्यम् उपसंगम्य राजा दुर्योधन तदा वचनम् अब्रवीत् ।

**अर्थ :** संजय धृतराष्ट्रास म्हणाला— त्यावेळीं पांडवांचे सैन्य व्यूहरचनेनें उभें राहिलेलें पाहतांच राजा दुर्योधन, गुरु द्रोणाचार्यांजवळ जाऊन म्हणाला ....(२)

**ते वेळीं संजयो बोले । म्हणे पांडव सैन्य उचललें ।**
**जैसें महाप्रळयीं पसरले । कृतांत मुख ॥ ८८ ॥**

**तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट ।**
**जैसें उसळलें काळकूट । धरी कवण ॥ ८९ ॥**

**ना तरि वडवानळु सादुकला । प्रळयवातें पोंखला ।**
**सागरु शोखुनिहि उधवला । अंबरासी ॥ ९० ॥**

**तैसें दळ दुर्धर । नाना व्यूह परिकर ।**
**अवगमले भयासुर । तियें काळीं ॥ ९१ ॥**

**ते देखोनि दुर्योधनें । अव्हेरिलें कवणें मानें ।**
**जैसे न गणिजे पंचाननें । गजघटातें ॥ ९२ ॥**

**मग द्रोणापासीं आला । तया म्हणे हा देखिला ।**
**कैसा दळभारु उचलला । पांडवाचा ॥ ९३ ॥**

ते वेळीं–तिये वेळीं. उचललें = क्षुब्ध झालें. संजयो–तो संजयो (८८). एकवाट–एकवट (८९). पोंखला–पोंखळा = पोसला, वाढला. शोखुनिहि–शोषूनि. उधवला = उसळला. सादुकला = भडकलेला. अंबरासी = आकाशापर्यंत (९०). अवगमले = भासलें (९१). गजघट = हत्तींचें कळप (९२). उचलला = उसळला (९३).

त्या वेळेस तो संजय म्हणतो आहे कीं, पांडव सैन्य क्षुब्ध झालेले तें कसें दिसलें म्हणावें तर जसें का कृतांताचें मुखच एक, महाप्रळयाचे वेळेस पसरलेले आहे जसें का–(८८)

तसें ते सैन्य घनदाट असें, एकदम वर आलें, दिसूं लागले–जसें, उसळलेले कालकूट ते कुणास बरे धरता, आवरतां येईल ? (८९)

अथवा असें म्हणूं कीं पेटलेला वडवानळ, प्रळयवातानें पोसलेला, पुष्ट झालेला, तो तर सागरासही शोषून गेला व वर आकाशापर्यंत उसळलेला आहे कीं–(९०)

तसे ते सैन्यदळ असह्य असे (दुर्धर) अनेक व्यूहानी सज्ज असलेले ते त्या वेळेस कीं अहो, महाभयावह (असह्य, भयंकर) भासले–जाणवले (९१)

ते दुर्योधनानें पाहून ते अनादरिले, तिरस्कारिले, कसें तर, जसें का सिंहाने गजसमुदायाकडे अगदीं तुच्छतेनेच पाहाणें होते जसें, नच जुमानिले होते जसें–(९२)

दुर्योधन मग आचार्य द्रोणापासी आला, व त्यांना म्हणूं लागला कीं–अहो, हे आचार्य, पाहिला देखिला काय हा पांडवांचा दळभार कसा उचलला, खवळलेला आहे ते....(९३)

**पश्यैतां पाण्डुपुत्राणाम् आचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

[एतां चमूम् पश्य = ही फौज, हे सैन्य पाहा. आचार्य = गुरु, पंडित. महतीम् = विस्तृत. व्यूढां = व्यवस्थित रचलेली (फौज, सेना). धीमता शिष्येण = बुद्धिमान अशा शिष्यानें, (धीमत् = पंडित, बुद्धिमान् धीः = भक्ति, ज्ञान, ज्ञानेंद्रिय, मन, कल्पना, विचार, बुद्धि). महत् = महत्तत्व, बुद्धि (सां). महत् = परमात्मा. महती = नारदवीणा, डोरली वांगी (व.)]

**अन्वय :** आचार्य! एतां पाण्डुपुत्राणाम् महतीम् चमूम् तव धीमता शिष्येण द्रुपदपुत्रेण व्यूढाम्, पश्य ।

**अर्थ :** अहो आचार्य, तुमचा बुद्धिमान शिष्य, द्रुपद राजाचा पुत्र धृष्टद्युम्न त्यानें व्यूहपरत्वें रचलेली ही पांडवांची मोठी सेना पाहा–(३).

**मग गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविधव्यूह सभंवते ।**
**हे रचिले आथि बुद्धिमंतें । द्रुपदकुमरे ॥ ९४ ॥**

**जो कां तुम्ही शिक्षापिला । विद्या देउनि कुरुठा केला ।**
**तेणें हा सैन्यसिंधु पाखारिला । देख देख ॥ ९५ ॥**

गिरिदुर्ग = डोंगरी किल्ले. व्यूह = सैन्यरचनेचा प्रकार, समूह; सैन्यरचना. सभोवते–भंवते = सभोंवार. (व्यूह = तर्कशास्त्र.) आथि = व्यवस्थित गुंफलेले, रचलेले [रचना = कृति, रचणें, व्यवस्था, उद्योग, विन्यास (रचना ठेव)]. द्रुपदकुमरे = धृष्टद्युम्न्यानें (९४). (शि = धार लावणें, क्षप् = उपास करणें). शिक्षा = शिकविणें, उपदेश (वर्णोच्चार शास्त्रवेदांच्या सहा अंगांपैकीं एक) उत्साह, समर्थ होण्याची इच्छा (शिक्षित = प्रवीण, शिकवलेला, आज्ञाधारक, शिकलेला). विद्या देउनि कुरुठा केला–विद्येसी वसौटा केला = शिक्षण देऊन शहाणा

केलेला, विथेला वसतिस्थानच एक केले ह्या धृष्टद्युम्न्यानें कीं. शिक्षापिला-शिष्य आपुला (शिष्य = चेला). पाखारिला-पाखरिला (पसरला) = पाखर, कळवळा, दया पसरणें. (पाखंड = वेदबाह्य). सैन्यसिंधु = दळसमुद्र, अपार फौज (९५).

तरी आतां तेथें तर जसें का चालतच आहेत असे डोंगरी किल्ले तसे विविध अनेक तऱ्हांचे व्यूह सभोंवार रचिले आहेत-कीं अहो, बुद्धिमंत अशा द्रुपदकुमर धृष्टद्युम्न्यानें कीं-(९४)

जो तुम्हीं शिक्षण दिलेला, शिक्षण-विद्या देऊन शहाणा केलेला, त्यानें तर हा दळसमुद्र कसा (सरसावलेला) उचलिलेला (खवळलेला-पसरिलेला) आहे, पहा, पहा-तो तर पसरणारा झाला आहे-(९५)

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**

[अत्र = ह्या येथें. शूरा = पराक्रमी वीर. महेष्वासा = महान्, वीर, विष्णु, (महीयस् वासाः = श्रेष्ठ-मोठे-धनुष्य धारण करणारे). भीमार्जुनसमा = भीम व अर्जुन यांच्या बरोबरीच्या कीर्तीचे. युधि = युद्धांमध्यें. युयुधान = क्षत्रिय, इंद्र, सात्यकि, योद्धा. विराटः = योद्धा, विराट राजा. महारथः द्रुपद = अजमीढ वंशज, पृशद राजाचा पुत्र. दहा हजार अस्त्र-शस्त्रशास्त्रप्रवीण अशा वीरांशीं लढणारा.]

**अन्वय :** अत्र युधि महेष्वासाः भीमार्जुन शूरा-क्षत्रिय सात्यकि विराट द्रुपद ।

**अर्थ :** येथें पांडवांच्या सैन्यांत युद्धविद्येंत भीम व अर्जुन यांच्या तोडीचे महाधनुर्धारी शूर-युयुधान, क्षत्रिय, सात्यकि, विराट, महारथी द्रुपद-(४)

**आणीकहि असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण ।**
**क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाति ॥ ९६ ॥**

**जे बळ प्रौढि पौरुषे । भीमार्जुना सारिखे ।**
**ते सांगेन कौतुके । प्रसंगेचि ॥ ९७ ॥**

**येथ युयुधान सुभटु । आला असे विराटु ।**
**महारथिया श्रेष्ठु । द्रुपद वीरू ॥ ९८ ॥**

असाधारण = महान्, लोकोत्तर. निपुण = तरबेज. आहाती = आहेत (९६). पौरुषे = बळाच्या पुरुषार्थानें. प्रौढी = उत्कंठा, साहस, प्रौढपणा (धीट, विवाहित) (९७). सुभटु = योद्धा (९८).

आणीकहि लोकोत्तर असे महान् वीर, जे शस्त्राच्या व अस्त्राच्या ठायीं प्रवीण चतुर असे असून क्षात्र-धर्मामध्यें निपुण, कुशल आहेत-(९६)

जे का बळाच्या प्रौढीने-उत्कंठेनें, साहसानें, तसेंच बळाच्या पुरुषार्थानें भीम व अर्जुनासारिखे असलेले ते पुढें प्रसंगानेच, कौतुकानेच कीं सांगण्याचें करीन-(९७)

येथें क्षत्रिय योद्धा उत्तम तऱ्हेने युद्ध करणारा असा विराट आला आहे. तसेंच श्रेष्ठ असा महारथी द्रुपद वीरही आला आहे-(९८)

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित् कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः ॥ ५ ॥**

[धृष्टकेतु = शिशुपाल पुत्र, पांडवपक्षीय; याची मुलगी करेणुमति नकुलास दिली होती. चेकितानः = एक यादव. हा युद्धांत पांडवांकडे होता. वीर्यवान काशिराज = एक राजा-अंबा, अंबिका, अंबालिका यांचा

पिता. पुरुजित् = कुंतिभोजाचा पुत्र, कुंतीचा भाऊ, अर्जुनाचा मामा. नरपुङ्गव शैब्यः = नरश्रेष्ठ, पांडवपक्षीय राजा. (शैब्यः = विष्णूच्या रथाचा एक घोडा)].

**अन्वय :** धृष्टकेतु, चेकितान्, वीर्यवान् , काशिराज, कुंतिभोज पुरुजित्, नरपुङ्गव शैब्यः ।

**अर्थ :** धृष्टकेतु, चेकितान्, बलवान् काशिराजा, पुरुजित् नांवाचा कुंतिभोज वंशांतील राजा, पुरुषश्रेष्ठ शिबी देशाचा राजा–(५).

**चेकितान धृष्टकेतु । काशिराज विख्यातु ।**
**उत्तमौजा नृपनाथु । शैब्यु देखे ॥ ९९ ॥**

**हा कुंतिभोज पाहे । येथें युधामन्यु आला आहे ।**
**आणि पुरुजितादि राये । सकळै जाण ॥ १०० ॥**

विख्यातु–विक्रांतु = पराक्रमी. देखे–देख (९९). येथें–एथ. राये हे–राय हे. सकळै जाण–सकळ देख. धृष्टकेतु = शिशुपालपुत्र. पांडवपक्षीय. यास द्रोणानें मारिलें. याची मुलगी करेणुमति नकुलास दिली होती. चेकितान = एक यादव, युद्धांत पांडवांकडे होता. काशीश्वरु–काशिराजा = एक राजा. अंबा, अंबिका व अंबालिका यांचा पिता. उत्तमौजा = पांचाल राजपुत्र–पांडवपक्षीय. शैब्यु = १) पांडवपक्षीय एक राजा. २) विष्णूच्या रथाच्या चार घोड्यांपैकीं एक. कुंतिभोज = एक राजा. कुंतिपिता. "शूर" राजाचा मित्र (शूर = मगध देशचा राजा, सुमित्रेचा बाप. ३) वसुदेव, कुंती, श्रुतश्रवा, इत्यादींचा पिता. कृष्णाचा आजा (शिशुपालाचा मातामह). याला अपत्य नसल्यामुळें यानें कुंतीला दत्तक घेतले होते. युधामन्यु = पांडवपक्षीय योद्धा. धर्माचा चक्ररक्षक. विक्रान्त = पराक्रमी, शूर, विजयी, बलिष्ठ योद्धा. पुरुजित् = कुंतिभोजाचा पुत्र, कुंतीचा भाऊ, अर्जुनाचा मामा. अभिमन्यु = अर्जुन व सुभद्रा यांचा पुत्र, कृष्ण व बलराम यांचा भाचा. हा अर्जुनाप्रमाणें मोठा पराक्रमी होता, परीक्षितीचा पिता. कौरवांचा चक्रव्यूह यानें भेदला, पण त्यास बाहेर पडतां येईना व शेवटीं मारला गेला.

चेकितान एक यादव; धृष्टद्युम्न, शिशुपालाचा पुत्र; परिणाम सामर्थ्याचा असा पराक्रमी काशिराज. उत्तमौजस् नृपनाथ पांडव पक्षीय पांचाल राजपुत्र, तसेंच नरश्रेष्ठ शैब्य नांवाचा राजा, हे पाहा–(९९)

हा कुंतिभोज पाहा–येथें युधामन्यु पांडवक्षीय योद्धा–हा धर्माचा चक्ररक्षक, तसेंच कुंतिभोज पुरुजित असे राय–राजे हे सकळ पाहा–(१००)

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

**अन्वय :** सर्व महारथा एव–युधामन्यु विक्रान्त च वीर्यवान् उत्तमौजा, सौभद्रो द्रौपदेयाः च ।

**अर्थ :** पराक्रमी युधामन्यु, वीर्यशाली उत्तमौजा, सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु आणि द्रौपदीचे पुत्र हे सगळेच महारथी आहेत (६).

**हा सुभद्राहृदयनंदनु । तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु ।**
**जो अपर नवा अर्जुनु । देखै द्रोणा ॥ १०१ ॥**

**आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर ।**
**मिति नेणिजे ऐसे अपार । मीनले आहाती ॥ १०२ ॥**

अपर = नवा दुसरा (१०१). मीनले = मिळाले. ऐसे अपार–परि अपार (१०२).

अहो द्रोणाचार्य! हा सुभद्रानंदन जो दुसरा नवा असा अर्जुन की काय असा दिसणारा, पराक्रमी असा तो अभिमन्यु सौभद्र पहा–(१०१)

आणीकही द्रौपदीचे कुमार आहेत, हे सकळ महारथी असे वीर आहेत–याची मिती नाहीं–पण अपार असे ते येथें मिळाले आहेत–एकत्र झालेले आहेत–(१०२)

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान् ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

[अस्माकं (अस्मत्) मी, आम्ही=आमचे. विशिष्टा=विलक्षण, श्रेष्ठ, मुक्त, अतिशय. तान् निबोध =त्याजबद्दल आठवण देतों, कळवितों, जागें करतों. (निबोधन=जाणणें, कळविणें). द्विजोत्तम=द्रोणाचार्य– मम सैन्यस्य नायका=माझ्या सैन्यांतील मुख्य पुरुष, वर्णनीय पुरुष (काव्यनाटकांतला प्रणयी पुरुष). तान् संज्ञार्थम् ब्रवीमि=ते नांव खुण (बुद्धि) जाणण्यासाठीं सांगतों.]

**अन्वय:** ये अस्माकं तु विशिष्टाः, मम सैन्यस्य नायकाः, तत् हे द्विजोत्तम, निबोध ते, तान् संज्ञार्थम् ब्रवीमि।

**अर्थ:** अहो, द्विजश्रेष्ठ द्रोणाचार्य, आतां आमच्या सैन्यामध्यें मुख्य मुख्य नायक असे जे प्रसिद्ध रूढ सैनिक अधिकारी वीर योद्धे आहेत, ते प्रसंगानेच मी उदाहरणार्थ सांगतों–ते आपण ऐकून घ्यावे (७).

**आतां आमच्या दळीं नायक। जे रूढवीर सैनिक।**
**ते प्रसंगेचि आईक। सांगेन मी ॥ १०३ ॥**

प्रसंगे–प्रसंगेचि. सांगेन मी–सांगिजति (१०३).

आतां आमच्या सैन्यामध्यें जे मुख्य अधिकारी प्रसिद्ध असे वीर आहेत, ते सहज प्रसंगानेच कीं मी सांगण्याचे करतों. (१०३)

**भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

[भवान्=आपण आचार्य द्रोण–आपण द्रोणाचार्य. भीष्म=भीष्माचार्य, गंगानंदन. कर्ण=कर्ण वीर. कृप=कृपाचार्य. समितिंजयः=लढाईत जय पावणारा वीर. (समिति=संयोग, युद्ध, समूह, सादृश्य, संकेत, सभा. जय=वीर रत्न). कृप=कृपाचार्य=गौतमकुलोत्पन्न शरद्वत् ऋषीचा पुत्र, अश्वत्थामाचा मामा. अश्वत्थामा=कृतांत ज्याला भितो असा द्रोणाचार्यांचा पुत्र. विकर्ण=एक धृतराष्ट्राचा पुत्र; हा फार न्यायी होता; द्रौपदी पणास लावणें हा अन्याय आहे, असें त्यानें भर सभेंत सांगितलें; यास भीमानें भारतीय युद्धामध्यें मारिलें. सोमदत्ति=चंद्रवंशीय वाल्हीक राजाचा पुत्र–भूरीश्रवस्‌चा पिता.]

**अन्वय:** भवान्, भीष्मः च, कर्णः च, कृपः च, समितिंजयः, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त, तथा एव च।

**अर्थ:** आपण द्रोणाचार्य, भीष्माचार्य, कर्णवीर, लढाईत जय पावणारा समितिंजय, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त तसेंच कीं....(८).

**उद्देशें येक दोनी। दाविजति बोलोनि।**
**तुम्हि आदिकरूनि। मुख्य जे जे ॥ १०४ ॥**

**हा भीष्म गंगानंदनु। जो प्रतापी तेजस्वी भानु।**
**रिपुगज पंचाननु। कर्ण वीरू ॥ १०५ ॥**

**यया एकैकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे ।**
**हा कृपाचार्या न पुरे । एकलाचि ॥ १०६ ॥**

**येथें विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहे ।**
**याचा अडदरु सदा वाहे । कृतांत मनिं ॥ १०७ ॥**

**समितिंजय सोमदंति । ऐसे आणीकहि बहुत आहाति ।**
**जेयांचया बळा मिति । धात्रा नेणे ॥ १०८ ॥**

उद्देशें दाविजति–जाइजती बोलोनी = सर्व योद्धयांची (उद्देशे) कल्पना येण्याकरितां एकदोन बोलून दाखवितो (१०४). रिपुगज पंचाचन = शत्रूरूपी हत्तीचा नाशक सिंह (१०५). यया एकैकाचेनि–एकेकाचेनि मनोव्यापारें = संकल्पमात्रेंकरून. कृपाचार्या–कृपाचार्य (१०६). अडदरु = धाक, दरारा. पैल = पलीकडे (१०७). आहाति = आहेत. जेयांचिया–जयांचिया. धात्रा–धाताही = ब्रह्मदेवसुद्धां (१०८).

एकदोन सांगतों, बोलून दाखवितों, ज्यायोगें सर्व योद्धयांची बरोबर कल्पना येईल–जे का तुम्हीं द्रोणाचार्य आदिकरून मुख्य असे जे जे आहेत–(१०४)

हे भीष्माचार्य–गंगानंदन–जे प्रतापानें तेजस्वी असे सूर्याप्रमाणें आहेत, याहीवर शत्रुरूपी हत्तीचे विदारण करणारे सिंहच जसे का–तसेंच वीर कर्ण आहे–(१०५)

ह्या एकएकाच्या नुसत्या संकल्पानेंच कीं हें विश्व होतें जातें–येथें तर एकटे कृपाचार्यच कीं पुरते असे होत कीं–(१०६)

येथें राजा धृतराष्ट्राचा पुत्र विकर्ण वीर आहे. हा पैल–पलीकडे अश्वत्थामा आहे, ज्याचा दरारा तर कृतांतही नेहमींच्या नेहमीं वाहून असतो–(१०७)

समितिंजय–संयोग युद्धसभामध्यें जय मिळविणारे वीररत्न समितिंजय आहे; तसेंच सोमदत्ति (सोमदत्ताचा पुत्र) सारखे आणीक पुष्कळ वीर आहेत, ज्यांच्या बळाची सीमा, मिति, प्रत्यक्ष ब्रह्मदेवहि जाणत नाहीं कीं–(१०८)

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

[ मदर्थे त्यक्तजीविताः = मजकरितां जीविताची आशा सोडलेले, जीवाची पर्वा नच करणारे, जीवावर उदार झालेले. नानाशस्त्रप्रहरणाः = अनेक प्रकारच्या शस्त्रकलेंत निष्णात. सर्वे युद्धविशारदाः = शस्त्र फेंकणें, युद्धांत हल्ला करणें, शस्त्र प्रहार करणें जें अशा सर्व कलांमध्यें हुशार, प्रवीण, प्रख्यात, धीट, प्रगल्भ.]

**अन्वय :** अन्ये, बहवः शूराः, च, सर्वे युद्धविशारदाः, नानाशस्त्रप्रहरणाः, विशारदाः, मदर्थे त्यक्तजीविताः सन्ति ।

**अर्थ :** दुसरे पुष्कळ शूरवीर आहेत, जे का मजकरितां जीवावर उदार झालेले, अनेक प्रकारच्या युद्धशास्त्रकलेंत निष्णात–अनेक शस्त्रप्रहार करण्यांत कुशल असे आहेत–(९).

**जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त ।**
**हो का जें अस्त्रजात । येथूनि रूढ ॥ १०९ ॥**

**हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रताप अंगीं ।**
**परि जिउ प्राणें मजचि लागीं । आराइले असती ॥ ११० ॥**

**पतिव्रतेचे हृदय जैसें । पतिवांचुनि न स्पर्शे ।**
**मी सर्वस्व या तैसें । सुभटांसी ॥ १११ ॥**

**आमुचिया काजाचेनि पाडें । देखति आपलें जीवित्व थोकडें ।**
**ऐसे निरवधि चोखडे । स्वामिकार्या ॥ ११२ ॥**

**झुंजती कुलकणि जाणति । केले कीर्तीसि जिति ।**
**हें बहु असो क्षात्रनीती । येथौनियां ॥ ११३ ॥**

**ऐसे सर्वापरि पुरते । वीरदळिं असती आमुतें ।**
**आतां काय गणुं तयांतें । अपार हे ॥ ११४ ॥**

[मंत्र=वेदभेदे गुप्तवादे रहसि कर्तव्य अवधारणे मंत्रः। (अमर०)] शस्त्रविद्यापारंगत=शस्त्रविद्येंत निपुण. मंत्रावतार मूर्त=साक्षात मंत्राचे अवतार. अस्त्रजात इथूनच रूढ=जे का इथूनच मुळीं अस्त्रविद्या जगांत आली, रूढ झाली, प्रसिद्धीस आली (१०९). अप्रतिमल्ल=सर्वोत्कृष्ट, ज्यांना प्रतिस्पर्धी नाहीं असे. आराइले=अनुसरले (११०). सुभट=वीर (१११). पाडे=तुलनेनें. थोकडे=अल्प, उणें. निरवधि चोखडे=निस्सीम, उत्तम (११२). कुलकणि=कुशलता. केले कीर्तीसि जिति = ज्यांना कळतें कीं कीर्तीस जगविणें हेंच जगणें. क्षात्रनीती=क्षत्रियांचा धर्म (११३). आमुते=आमुचे=गणुं–मोजूं तयांना, ते तर अपार असे आहेत (११४).

शस्त्रविद्येंत निपुण, मंत्राचे अवतार साक्षात्-जेथूनच मुळीं ही अस्त्रविद्या जगांत आली, रूढ झाली, प्रसिद्धीस आली असे पुष्कळ वीर आहेत–(१०९)

असे हे ज्यांना ह्या सर्व जगामध्यें प्रतिस्पर्धी नाहीं असे मल्ल. अंगी पुरा प्रताप, पराक्रम, तेज, ऐश्वर्य आहे असे, असे ते तर मजकरितांच सर्व प्राणानेंच कीं मजला अनुसरले (आराइले) आहेत–(११०)

जसें पतिव्रतेचे हृदय पतिवांचून दुसरीकडे स्पर्शत नाहीं, तसें सुभटांचे–वीरांचे ह्या–मीच एक सर्वस्व आहे–(१११)

आमच्या काजाच्या तुलनेनें तर ते आपले जीवित अगदीं अल्प असेंच मानून आहेत, पाहत आहेत, असे उत्तम स्वामिभक्त कीं– (११२)

झुंज करणारी कुशलता जाणतात, कीर्ति करणें हेंच ज्यांचे जगणे, कीर्ति करणें हेंच जीवित जगणें हें ज्यांचे, इथूनच क्षत्रियधर्म तो जगात रूढ का प्रसिद्धीचा झाला–(११३)

असे सर्वतोपरी पुरते असे आमुच्या सैन्यामध्यें वीर आहेत–त्यांची गणतीच नाहीं कीं, जे का ते मोजले जातील असे नव्हे–(११४)

**अपर्याप्तं तदस्माकम् बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषाम् बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

[अपर्याप्तं=अपरिमित. बलं=सैन्य, सामर्थ्य. अभिरक्षितम्=सांभाळलेले, लपविलेले, काळजी घेतलेले, राखलेले, परिहार केलेले, निवारण केलेले. पर्याप्तं=परिमित, प्रचुर, पुष्कळसे.]

**अन्वय :** अस्माकं तत बलं अपर्याप्तं भीष्माभिः रक्षितम् तु एतद् एतेषां बलं पर्याप्तं अभिरक्षितम् भीमाभिः ।

**अर्थ :** ते हे आमचे अपरिमित सैन्य भीष्माकडून संरक्षिले जात आहे–आणि त्या पांडवांचे ते परिमित म्हणजे थोडेंसें सैन्य भीमाकडून संरक्षिले जात आहे–(१०).

सर्वे क्षेत्रियामाजी श्रेष्ठु। जो जगजेठीं सुभट्ठु।
तयां दळवैपणाचा पाटु। भीष्मासी पैं ॥ ११५ ॥

आतां याचेनि बळे गवसलें। हे दुर्ग जैसे पन्नासिलें।
येणें पाडें थेकुलें। लोकत्रय ॥ ११६ ॥

आधींचि समुद्र पाही। तेथें दुवाडपणा कवण काई।
मग वडवानळु तैसयाही। विरजा होय ॥ ११७ ॥

ना तरि प्रलयवन्हि महावातु। या दोही होय सांघातु।
तैसा हा गंगासुतु। सेनापति ॥ ११८ ॥

आतां येणेसी कवण भिडे। हे पांडव सैन्य कीर थोकडें।
वरिचिल अपाडे। दिसतसे ॥ ११९ ॥

यावरि भीमसेन बेथु। तो जाला असे सेनानाथु।
ऐसें बोलुनि मातु। सांडिली तेणें ॥ १२० ॥

क्षेत्रियामाजी = इंद्रियनिग्रही लोकांमध्यें. (क्षत्र = क्षत्रिय, शरीर. क्षत्रियाणि = क्षत्रिय स्त्री. क्षेत्र = शेत, क्षेत्र, पुण्यभूमि. क्षेत्रिय = जार, कुरण. क्षेत्रज्ञ = ज्ञानी पुरुष, आत्मा. क्षेत्रिक = नवरा, (शेतकरी). जगजेठी (जगज्ज्येष्ठ) = जगाहूनहि मोठा, वडील, मोठा योद्धा. सुभटु = मोठा योद्धा. दळवैपणाचा पाटु = सेनापतिपदाचा अधिकार (११५). गवसले = सांपडले, आश्रित झाले. दुर्ग जैसे = जसा का किल्लाच एक. पन्नासिले = शृंगारिले. येणें पाडें थेकुलें = याच्या तुलनेने अल्प असें. लोकत्रय = स्वर्ग, पृथ्वी, पाताळ (११६). दुवाडपणा = दुस्तरपणा. वडवानळु = समुद्रांतील अग्नि. विरजा = साह्यकर्ता (११७). महावातु = सोसाट्याचा वारा, प्रभंजन. सांघातु = संयोग, ओघ, समूह. गंगासुतु = भीष्माचार्य (११८). थोकडें = थोडेंच असें. कीर = निश्चयानें. (ओइचलेनि पाडें)—वरिचिलेनि अपाडे = सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या मानानें (११९). बेथु = दांडगा. सेनानाथु = सैन्याचा स्वामी. मातु सांडिली = उगा राहिला, बोलण्याचा विषय थांबविला (१२०).

क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ, जगामध्यें उत्तम वीर असा हा मोठा योद्धा, अशा त्या भीष्माचार्यांना सेनापतिपदाचा अधिकार आलेला आहे, दिलेला आहे–(११५)

याच्या बळानें आश्रित झालेले, किल्ल्याप्रमाणें शृंगारलेले, रचलेले असे, याच्या योग्यतेपुढें तर लोकत्रयही अल्प असें होय–(११६)

अहो, अगोदरच समुद्र अगाध–तेथें दुस्तरपणाच केव्हांहि–कवणासहि तो, अशांतही वडवानळ साह्यकर्ता झाला जसा–(११७)

अहो प्रळयवन्हि व महावात या दोघांचा संयोग झाला–ओघास ओघ मिळाला, तसा हा सेनापति भीष्म जाण–(११८)

आतां याजबरोबर कोणीही लढणें शक्यच नाहीं, आतां याजबरोबर कोण तो लढणार? हे पांडवसैन्य तर सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या तुलनेनें खरोखरी अगदीं थोडें असें दिसत आहे–(११९)

याहीवर दांडगा असा भीम, तो त्यांच्या सैन्याचा सेनापति–स्वामि झाला आहे, असें बोलून तो उगा झाला–त्यानें बोलणें थांबविलें–(१२०)

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥**

[अयन=(स्थान, मार्ग, शास्त्र, ज्योतिष, प्रकार, पद्धत, मोक्ष, सूर्याचे उत्तरेकडे व दक्षिणेकडे गमन, समुद्रायन, गति, रस्ता, देह, काल, समय, सैन्य प्रवेश मार्ग, विशिष्ट यज्ञ व त्याचा काल). अयनेषु च सर्वेषु=सैन्यामध्यें प्रवेश होण्याचा मार्ग–अशा त्या सर्व मार्गावर. यथाभागमवस्थिताः=वाट्याला आल्याप्रमाणें राहणें योजणें झालेले. भवन्तः सर्व एव=आपणा तुम्हीं सर्वांनीं. भीष्मम् एव अभिरक्षन्तु=भीष्माची काळजी घेणें, भीष्मास सांभाळणेचे करावे. हि=केव्हांहि.]

**अन्वय:** सर्वेषु अयनेषु यथा भागम् अवस्थिताः भवन्तः हि सर्व एव भीष्मम् एव अभिरक्षन्तु ।

**अर्थ:** (१) सैन्य प्रवेशद्वाराचे ठायीं नेमलेल्या जागीं राहून सर्वांनीं भीष्माचार्यांचे रक्षण करावे, त्यांची काळजी घ्यावी, त्यांना सांभाळावे.

(२) म्हणून नेमल्याप्रमाणें सर्व सैन्य प्रवेश मार्गावर उभे असलेल्या आपणां सर्वांनी भीष्माचेंच रक्षण करावें (११).

**मग पुनरपि काय बोले । सकळ सैन्यकांतें म्हणितले ।**
**आतां दळभार आपुलाले । सरिसे करा ॥ १२१ ॥**

**सेना या अक्षोहिणी । तेणेसि तिया रणि ।**
**वरगण कवण कवणि । महारथिया ॥ १२२ ॥**

**तेणें तिये आवरिजे । भीष्मातळीं राहिजे ।**
**द्रोणातें म्हणे पाहिजे । सकळ तुह्मि ॥ १२३ ॥**

**हाचि येकु रक्षावा । मी तैसा हा देखावा ।**
**येणें दळभारु आघवा । सांच आमुचा ॥ १२४ ॥**

दळभार=सैन्यसमूह. सरिसे करा=सज्ज करा (१२१). अक्षोहिणी=रथ तितकेच हत्ती, हत्तीच्या तिप्पट घोडे, घोड्यांच्या पांचपट पायदळ (२१८००). आरणि=युद्धस्थानीं. वरगण = वांटणी. महारथिया =दहा हजार योद्धयांशीं एकटा लढणारा–युद्ध करणारा (१२१). आवरिजे=आवरावे. तेणें तिया=तेणेसि सैन्येसि. भीष्मातळीं=भीष्माच्या आज्ञेखालीं–भीष्माच्या आधारानें असावे. पाहिजे (परिक्षिजे) ऐकावे, देखरेख ठेवणाऱ्याच्या हुकुमांत राहावें (१२३). आघवा=सर्व. सांच=खरा, चांगला (१२४).

नंतर सकळ सैनिकांना म्हटलें कीं, आतां आपआपलें सैन्यभार एकत्र करा, सज्ज करा–(१२१)

ज्या ज्या, ज्यांच्या ज्यांच्या अक्षौहिणी सेना आहेत, त्यांनी–त्या त्या युद्धस्थानी आवराव्यात व वाटणी ती करावी–कवण कवण ते महारथी ते–(१२२)

त्या सेना त्यायोगानें आवराव्यात व त्यांनी भीष्माच्या आज्ञेखालीं राहावे–भीष्माच्या आधारानें असावें; व तुम्हीं सर्वांनीं द्रोणाचार्यांना पाहावे–परिसावें–(१२३)

हा भीष्मच एक, द्रोणच एक रक्षावा, मी तसा हा पाहावा, सांभाळावा, देखावा, माझ्या जागींच हा पाहावा; व यायोगेंच कीं, आमचा हा सर्व सैन्यभार चांगला असा सांच, खरा, सत्य जाणावा–(१२४)

तस्य संजनयन् हर्षम् कुरुवृद्धः पितामहः।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

[ हर्षं संजनयन् तस्य दुर्योधनस्य = दुर्योधनाच्या त्या भाषणानें भीष्मांना हर्ष झाला–हर्ष उत्पन्न करणारे तें दुर्योधनाचें भाषण ऐकून. कुरुवृद्धः पितामहः भीष्म, उच्चैः सिंहनादं विनद्य = कुरुकुळांतील अतिवृद्ध असे पितामह भीष्म त्यांनीं मोठ्यानें सिंहासारखी गर्जना केली व—प्रतापवान् शंखं दध्मौ = प्रतापी भीष्मांनीं आपला शंख आस्फुरिला, वाजविला, फुंकिला.]

**अन्वय :** ( इदं भाषणं ) तस्य ( दुर्योधनस्य श्रुत्वा ) हर्षं संजनयन भीष्म पितामह कुरुवृद्धः प्रतापवान् सिंहनादं उच्चैः विनद्य शंखं दध्मौ ।

**अर्थ :** (१) हे असें हर्ष उत्पन्न करणारें दुर्योधनाचें भाषण भीष्मांनी ऐकिले व त्यांना हर्ष झाला व (दुर्योधनाला उत्तेजित करण्यासाठीं म्हणा का आपला अभिमान वर आल्याने) त्यांनी मोठ्यानें सिंहनाद करून आपला शंख फुंकिला.

(२) सर्व कौरवांत वडील पराक्रमी आजोबा भीष्म मोठ्यानें सिंहासारखी गर्जना करून शंख फुंकिते झाले–त्या दुर्योधनाला हर्ष उत्पन्न करणारें जसें तें–(१२).

**या रायाचिया बोला । सेनापति संतोषला ।**
**मग तेणें केला । सिंहनाद ॥ १२५ ॥**

**तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्यां आंतु ।**
**प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥ १२६ ॥**

**तयाचि तुलिगासवे । वीरवृत्तिचेनि थांवे ।**
**दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥ १२७ ॥**

**ते दोन्ही नाद मिनले । तेथ त्रैलोक्य बधिरभूत झालें ।**
**जैसें आकाश का पडिलें । तुटोनियां ॥ १२८ ॥**

**घडघडित अंबर । उचंबळत सागर ।**
**क्षोभले चराचर । कांपत असे ॥ १२९ ॥**

**तेणें महाघोष गजरें । दुमदुमिली गिरिकंदरें ।**
**तंव दळामाजी रणतुरें । आस्फुरिलीं ॥ १३० ॥**

रायाचिया–राजयाचिया. सिंहनाद = वीरगर्जना. सिंहवाहना–सिंहयाना = पार्वती. सिंहल = दालचिनी, पितळ, कथिल. सिंहाणं, सिंहानं, सिंहावकं = नाकांती मळ, लोखंडाचा गंज. सिंहुड = निवडुंग (१२५). गाजत = आवाजाप्रत येत आहे. अद्भुत = आश्चर्यजनक, चमत्कारिक. न समातु उपजत असे = न मावणारा उत्पन्न होत आहे, उगवत आहे (१२६). तुलिगासवे–तुलगासवे = प्रतिध्वनीमुळें. थांवे = बळानें. आस्फुरिला = फुंकिला, वाजविला (१२७). बधिरभूत–बधिरीभूत = बहिरे झाले (कानठळीच बसली) (१२८). घडघडित अंबर = आकाश गडगडत आहे. उचंबळत सागर = समुद्र खवळत आहे. चराचर क्षोभले = स्थावरजंगम जग व्यग्र झालें, उद्वेगाप्रत आलें (१२९). दुमदुमिली–दुमदुमिताति = आवाजानें भरून गेली. गिरिकंदरे = पर्वत, गुहा, खोरी. रणतुरें = रणवाद्य (१३०).

दुर्योधनाच्या त्या भाषणानें सेनापति भीष्म तृप्ति–आनंदाप्रत–संतोषाप्रत येऊन, त्यांनीं सिंहासारखी–वीरासारखी गर्जना केली–(१२५)

तो सिंहनाद दोन्हींही सैन्यामध्यें अद्भुतपणें गर्जत होता. त्याचा प्रतिध्वनि कुठेंही मावेनासा होऊन, उपजत, उमगत होता–उत्पन्न होत होता–(१२६)

त्या तुळिगा = प्रतिध्वनीबरोबरच वीर वृत्तीच्या सखोलपणानें भीष्मदेवांनीं आपला दिव्य शंख आस्फुरिला, वाजविला–(१२७)

ते दोन्ही नाद–तो सिंहनाद व तो शंखाचा नाद–जेव्हां का मिळाले, मिडले, तेव्हां तर त्रैलोक्य बधिरभूत झालें–त्रैलोक्याच्या कानठळ्या बसल्या. जसें का, आकाशच मुळीं उंचावरून तुटून पडावें–(१२८)

आकाश ते धडधडत होऊं लागलें, सागर उचंबळून चराचर सृष्टि क्षोभाप्रत येऊन आहे–कंपित होऊन आहे–(१२९)

त्या महाघोषाच्या गजरानें गिरिकंदरें–पर्वताच्या गुहा–दुमदुमून गेलीं तों इकडे सैन्यामध्यें रणतुरें–(रणवाद्यें) वाजूं लागलीं–वाजविलीं जाऊं लागलीं–(१३०)

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

[शंख = जलचर प्राण्याचें अस्थिरूप आवरण; कपाळाचें हाड; एक वाद्य व त्याचा नाद. भेरि = नौबत. पणवान् = (पणव = ढोलकें)–पणव = ढोल, पडघम, मृदंग (वाद्यप्रभेदाः, वाद्यविशेषा ज्ञेया = डमरू, मड्डु, डिण्डिम, झर्झरः, मर्दलः, पणवः।) अन्ये हुडुक गोमुखादयः सन्ति॥ [पणविन् = शंकराचें नांव. गोमुख = एकप्रकारचें वाद्य–गोमुखमिव मुखमस्य। (आपटे). पणव आनक गोमुखाः।] आनक = फौजी वाद्य. शंखाः भेर्यः - पणवानकगोमुखाः = शंख, भेरी, झांजा, शिंगें, इत्यादि रणवाद्यें. स शब्द = तो रणनाद. सहसा एव = एकाच वेळीं–अकस्मात. अभ्यहन्यन्त (हन्+अभि) = वाजविलीं गेलीं, रणघोर वादन झालें, वाद्यें आघाताचीं केलीं गेलीं. तुमुल = कानठळ्या बसविणारा. अभवत् = झाला.]

**अन्वय :** ततः, सहसा एव, अभ्यहन्यन्त, शंखाः, भेर्यः, च, पणव, आनक, गोमुखाः, स शब्दः, अभवत्, तुमुलः।

**अर्थ :** त्यानंतर (कौरवांकडून) एकाच वेळीं अकस्मात सहस्रशः शंख, भेरी, झांजा, शिंगें इत्यादि रणवाद्यें वाजविलीं गेलीं–तो शब्द–तो रणनाद–कानठळ्या बसविणारा झाला–(त्यानंतर कौरवच मुळीं ते हादरून गेलेले ते तेथें आतां)–(१३).

नाना उमाळे वीरांचे । गर्जति वीरवृत्तिचेनि सांचे ।
येरयेरां पुढे उर्मिचे । बळे दाविती ॥ १३१ ॥

उदंड सैंध वाजते । भयानके खाखाते ।
महाप्रळयो जेथें । धाकडासी ॥ १३२ ॥

तेथ भेडांची कवण मातु । काचया केर फिटतु ।
जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ १३३ ॥

भेरी निशाण मांदळ । शंख काहाळ भोंगळ ।
आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ १३४ ॥

आवेशें भुजा त्राहाटिती । विसणले हांका देती ।
जेथ महामद भद्रजाती । आवरती ना ॥ १३५ ॥

**येका उभयांचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले ।**
**बिरुदाचे दादुले । हिंवताती ॥ १३६ ॥**

**ऐसा अद्‌भुत तुरबंबाळु । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु ।**
**देव ह्मणति प्रळयकाळु । वोढवला आजी ॥ १३७ ॥**

उमाळे=लोट, पूर, प्रेम, राग, विकाराचे आवेग, आवेश (उर्मिबळे) साचे=खरेपणानें, साचे असे. बळे उर्मिचे=लहर, लाट, वेग, उमाळा उर्मिवेगाच्या बळामुळें (क्षुधा, तृषा, जरा, मृत्यु, शोक, मोह हे जीवाचे सहा धर्म) (१३१) उदंड सैंध वाजते=वाजंत्रीं पुष्कळशीं, अनेक प्रकारचीं वाद्यें. भयानके खाखाते =कर्कश, प्राणहारक, भयकारक, भयंकर, भीति वाटणारी. धाकडासी–धोकडासी महाप्रळयो जेथें=धैर्यवंतास, धीट जे त्यांना जसा का प्रळयकाळ–सृष्टीचा संहारच जेथें (१३२). भेडांची मातु कवण=भित्रे जे त्यांची काय मात सांगावी ती. काचया केर फिटतु=कच्चे जे ते तर पाचोळ्यासारखे उडाले. आंग नेघे=शरीर वेचेना–दखल देईना–भाग घेईना (१३३). भेरी=नौबत. निशाण=रणभेरी, नगारा. मांदळ=विशेष रणवाद्य शंख=शंखवाद्य. काहाळ=झांज. भोंगळ=तुतारी. भयातुर=भीतीनें अत्यंत पीडलेले, विव्हळ. रणकोल्हाळ=रणांतील कोलाहल, रणकल्लोळ. सुभटांचे=मोठ्या वीरांचे (१३४). भुजा त्राहाटिती=दंड थोपटत आहेत. विसणले=क्षुब्ध झालेले (निवलेले–येसणैले–). हांका देती=मोठ्यानें हांका देत आहेत, बोलत–बोलवीत आहेत. महामद भद्रजाती=धुंदीची, उन्मादाची, मस्तीचे हत्तीची जाति (१३५). उभयांचि =उभ्याउभ्याच चांगाचे दात बैसले=चांगल्या चांगल्या धैर्यवंतांचीं तोंडें बंद झालीं. बिरुदाचे दादुले हिंवताती=थोर अशा ब्रीदाचे, प्रतिज्ञेचे ते तर थरथर कांपत आहेत (१३६). अद्‌भुत तुरबंबाळु=आश्चर्यकारक वेगवान शीघ्र असा वाद्यध्वनि, रणवाद्यांचा कडाका–ध्वनि–भयानक अतिकर्कश अशीं वाजंत्रीं वाजूं लागलीं. व्याकुळु=गोंधळलेला, कर्तव्यमूढ, चंचल. वोढवला आजी प्रळयकाळु=धीट जे त्यांनाही पण जसें का, महाप्रळयच ओढवला आहे–मांडला आहे–असें होऊन आहे (१३७)

वीरांचे अनेक आवेग विकाराचे ते गर्जत आहेत. वीरवृत्तीच्या साचेपणानें, एकमेकांपुढें उमाळ्याच्या वेगामुळें वेग मुद्दामच कीं दाखवीत आहेत–(१३१)

एकसारखी भयानक अशीं कर्कश पुष्कळशीं रणवाद्यें वाजंत्रीं वाजूं लागलीं, धाकडधीट होते त्यांनाही पण ते जसें का, महाप्रळयच मांडला आहे कीं काय असें होऊन होते–(१३२)

नौबत नगारा मांदळ नांवाचें विशेषसें रणवाद्य, काहळा म्हणजे झांजा, भोंगळ म्हणजे तुताऱ्या वाजूं लागल्या. मोठमोठ्या योद्ध्यांचे भयासुर असे ते भयंकर शब्द, रणकोलाहळ वाद्यध्वनि होत आहेत–(१३३)

ते योद्धे वर जसे का मोठमोठ्या आवेशानें दंड थोपटीत होते, विसणैले–आवेशयुक्त झालेले–ते हांका देत होते, तेथें मोठ्या धुंदीची उन्मादाची ती हत्तीची जाती तर मुळींच आवरिली होईना–(१३४)

तेथें भित्र्यांची ती गोष्ट कसची न काय? कच्चे होते ते तर पाचोळ्यासारखे उडाले होत होते, त्यायोगें कृतांत दचकला–तो तर आपले आंगच तेथें देईना–घेईना–तो तेथें येईचना। (१३५)

एकाचे, कांहींचे तर उभ्याउभ्याच प्राण गेले–धैर्यवंतांचे तर दातच बसले–त्यांचीं तोंडेंच बंद झालीं–थोर अशा ब्रीदामध्यें जे बांधलेले, ते तर थरथर कांपत होते–ते तर कांपत आहेत कीं–(१३६)

असा अद्‌भुत आश्चर्यकारक तुरबंबाळ म्हणजे भयंकर वाद्यध्वनि तो ऐकून, ब्रह्मदेवही व्याकुळ होऊन आहे. देव म्हणत आहेत कीं, आज येथें तर प्रळयकाळच मांडला होऊन आहे–(१३७)

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

[ श्वेतैर्हयैर्युक्ते = (१) बलाहक, (२) शैब्य, (३) सुग्रीव, (४) मेघपुष्प या नांवाचे पांढरे घोडे जुंपलेल्या. महति स्यन्दने स्थितौ = मोठ्या रथामध्यें बसलेले माधव व पांडव. स्यन्दन = युद्ध मर्म यस्य तस्मिन् चक्रयुक्ते याने शताङ्गः स्यन्दनः रथः इति । शङ्खौ दिव्यौ प्रदध्मतुः = त्यांनीं आपले दिव्य शंख फुंकिले, वाजविले. ]

**अन्वय :** श्वेतै हयै युक्ते महति स्यन्दने स्थितौ माधव पाण्डव च एव ततः दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ।

**अर्थ :** पांढरे घोडे जुंपलेल्या मोठ्या श्रेष्ठ (पूजनीय) रथामध्यें आरूढ झालेले भगवान श्रीकृष्ण माधव व पांडव अर्जुन त्यांनीं आपले दिव्य स्वर्गीय शंखनादाचे वाद्य-शंख ( सिंधुपुष्प )- वाजविलें, फुंकिलें (१४).

**ऐसी स्वर्गींची मातु । देखोनि तो आकांतु ।**
**तव (पांडव) दळां आंतु । वर्तले काई ॥ १३८ ॥**

**हो का निजसार विजयाचे । कीं ते भांडार महातेजाचें ।**
**जेथें गरुडाचे जावळिचे । कांतिले चान्हि ॥ १३९ ॥**

**कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवे तैसा ।**
**तेजें कोंदाटिलया दिशा । जयाचेनि ॥ १४० ॥**

**जेथें अश्ववाहकु आपण । वैकुंठीचा राणा जाण ।**
**तया रथाचे गुण । काय वानु ॥ १४१ ॥**

**ध्वजेवरी (ध्वजस्तंभावरि) वानरु । तो मूर्तिमंत श्रीशंकरु ।**
**सारथी सारंगधरू । अर्जुनेसी ॥ १४२ ॥**

**देखा नवल तया प्रभुचे । अद्‌भुत प्रेम भक्तांचे ।**
**जे सारथ्य पार्थाचे । करितुसे ॥ १४३ ॥**

**पाइक पाठीसी घातला । आपण पुढां राहिला ।**
**तेणें पांचजन्य आस्फुरिला । अवलीळाचि ॥ १४४ ॥**

स्वर्गींची-स्वर्गी. काइ-कायी (१३८). गरुडाचे-गरुडाचिये. जावळिचे = गरुडासारखे वेगवान्, गरुडाच्या बरोबरीचे. कांतिले-कांतले = जुंपले. चान्हि = चार घोडे (१३९). रहंवर-रहंवरु = रथ उत्तम (रहंस् = वेग, आवेश. रहं+वर = श्रेष्ठ वेगाचा, वेगवान्, वेग घेणारा रथ. वृ×वर = घेणारा. रहं, तर, रथः, स्यदः, अवः इति ५ वेगस्य। मनोजव = मनापेक्षांहि वेगवान). कोंदाटिल्या-कोंदाटिलिया (१४०). जेथें-जेथ. अश्ववाहक = सारथी. वानु = वर्णु. गुण = ज्ञानेंद्रिय, रूपादि पंचविषय. अंतःकरण, बुद्धि, सद्‌गुण (१४१). ध्वजेवरी-ध्वजस्तंभावरि. वानरु-वानर = मारुती.* सारंगधर-शार्ङ्गधर (१४२). सारथ्य-सारथ्यपण. करितसे-करित असे (१४३). पाइक = सेवक, उपासक, अनुरक्त, भक्त. अवलीळाचि = सहज लीलेनें (१४४).

[ **टीप :** * पवनसुत = हनुमान, मारुति. १) पवन, २) वायु, ३) वात, ४) मारुत, ५) मरुत्, ६) जगत्प्राण, ७) समीरणः, ८) नभस्वान्, ९) पवमान्, १०) प्रभञ्जनः, ११) गंधवह, १२) गंधवाह, १३) श्वसनः, १४) स्पर्शनः, १५) मातरिश्वा, १६) सदागतिः, १७) पृषदश्व, १८) अनिलः, १९) आशुगः, २०) समीर. वायु हा वेगाबद्दल प्रसिद्ध म्हणून, येथें वेग त्या शब्दाकरितांही वेग, वायु गतिसंबंधींची ती म्हणून घेतली—गण्डः कपोलः इति २ कपोलस्य । ताभ्यां कपोलाभ्यां परा चिबुकस्याधो हनुरिति। ]

अशी स्वर्गामधील ती गोष्ट तेथचा तो आकांत देखिला-पाहिल्यामुळें-(तों) इकडे पांडवदळामध्यें काय वर्तलें तें पहा-(१३८)

जसे का विजयाचे (आपले स्वाभाविक बळ, तात्पर्य, दृढता, तत्त्वांश) स्वभावेंकरूनच श्रेष्ठ असें अथवा तें महातेजाचें-मोठ्या श्रेष्ठ अशा कांतीचें-प्रतापाचें, कीर्तीचें भांडारच (खजिना, कोठारच) जसें, जेथें का गरुडासारख्या वेगाचे-गरुडाच्या बरोबरीचे असे चार घोडे जुंपले आहेत-कातिले आहेत-(१३९)

जसा का मेरुपर्वतच एक त्यास पंख लाविलेले, जसा पंख असलेला पर्वत तसा रथ शोभत आहे-रथ, रहंवर तो मिरवत आहे-त्याच्या तेजानें, कांतीनें, वीर्यानें, प्रतापानें तर सर्वच्या सर्व दिशा कोंदाटिल्या गेल्या आहेत; दिशा तेजस्वीतेनें-अग्नितेजानें-दाट भरलेल्या आहेत-(१४०)

सारथी अश्ववाहक ज्या रथाचा, प्रत्यक्ष वैकुंठीचा तो राणा भगवान्, षड्गुणैश्वर्य भगवान श्रीकृष्ण जाणावा कीं, अशा त्या रथाचे गुण (-शौर्यचातुर्यादौ-संधिविग्रहादौ इंद्रिये च गुणः-) काय वानण्याचे होईल असें नाहीं-(१४१)

रथध्वजस्तंभावर-रथाच्या ध्वजेवरी वानर आहे-अहो तो तर मूर्तिमंत प्रत्यक्ष श्रीशंकर व अर्जुनाचा तर सारथि तो तर शार्ङ्गधर भगवान शार्ङ्गिन् विष्णु तिरंदाज-शृंगाचे धनुष्य हातामध्यें धरणारा तो-(१४२)

प्रभूचें त्या नवलच कीं-जे का भक्ताच्या प्रेमाचे अद्भुतपणामुळें तो भगवान श्रीकृष्ण पार्थाचे सारथ्यपणच करीत आहे कीं-(१४३)

पाईक, सेवक, भक्त, उपासक, अनुरक्त तो त्या भगवंतानें पाठीशीं घालून आपणच पुढें झाला आहे, राहिला आहे. त्यांनीं आतां तर अहो सहज लीलेनेंच कीं आपला पांचजन्य-विष्णु जो आपणच कीं भगवान श्रीकृष्ण त्याचा-अग्निरूप म्हणा-देवनळ विशेष शंख कीं फुंकिला, आस्फुरिला-(१४४)

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।**
**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥**

[पाञ्चजन्य=श्रीविष्णूचा शंख. लक्ष्मीपतेः विष्णोः शङ्खः पांचजन्यः-हृषिकेशः=ज्ञानेंद्रिय स्वामी-दामोदरोहृषीकेशः केशवः-देवदत्त=(१) अर्जुनाचा शंख. (२) कोणी तरी फलाणा. (३) वायु. धनंजयः= अर्जुनः फाल्गुनो जिष्णु किरिटी श्वेतवाहनः बिभत्सुः विजयो कृष्ण सव्यसाची धनंजयः ।। पौण्ड्रं-पौण्ड्रकः= (१) भीमाचा शंख. (२) एक प्रकारची साखर. (३) शूद्र भेद. (४) टिळा. (५) लावा पक्षी. पौंड्रकम् =मिश्र वर्णाचा ऊंस (पौण्ड्रिक). ध्मा=दध्मौ=आस्फुरिला. भीमकर्मा (=भीम=दमयंतीचा बाप, पांडवांपैकीं दुसरा, भयानक रस, भयंकर. कर्मा-भयंकर काम, प्रयत्न करणारा)=बलाढ्य. वृकोदरः (=वृक =लांडगा, कावळा) = भीम, ब्रह्मा. भीमसेन = पांडवांपैकीं दुसरा. हा कुंतीस वायुपासून झालेला पुत्र. हा अति बलिष्ठ असल्यामुळें लहानपणीं खेळांत देखील दुर्योधन इत्यादिकांस सर्वांस शासन करीत असे-बळरामापाशीं गदायुद्ध शिकला. यास दहा हजार हत्तींचें बळ होतें-यानें बकासुर, हिडिंब, जरासंध, किचक, इत्यादि मोठमोठ्या वीरांना मारिलें. अज्ञातवासांत बल्लव नांवानें विराटाकडे राहिला, व तेथें पाकशाळेचा मुख्य होता-धृतराष्ट्राच्या दुर्योधन, दुःशासन, इत्यादी शंभरहि पुत्रांस यानेंच मारिलें.]

**अन्वय :** हृषीकेशः पांचजन्यं दध्मौ। धनंजय देवदत्तं दध्मौ। भीमकर्मा वृकोदरः महाशङ्खं पौण्ड्रं दध्मौ।

**अर्थ :** श्रीकृष्ण हृषीकेशांनीं पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त, आणि भयंकर कर्में करणाऱ्या-बलाढ्य अशा भीमानें, जसा का ब्रह्माच कीं तो एक, त्या भीमानें पौण्ड्र नांवाचा मौल्यवान् महाशंख वाजविला-(१५).

परी तो महाघोष थोरु । गाजतसे गहिरु ।
जैसा उदेला दिनकरु । लोपी नक्षत्रांतें ॥ १४५ ॥

तैसे तुरबंबाळ भंवते । कौरवदळीं गाजत होते ।
ते हारपोनि नेणो केउते । गेले तेथे ॥ १४६ ॥

तैसाचि देखें येरें । निनादे अति गहिरें ।
देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ १४७ ॥

ते दोनी शब्द अचाट । मीनले एकवाट ।
तेथें ब्रह्मकटाह शतकुट । हों पाहतसे ॥ १४८ ॥

तंव भीमसेनु विसणैला । जसा महाकाळ खवळला ।
तेणें पौंड्र आत्राटिला । महाशंखु ॥ १४९ ॥

महाघोष थोरु = महागजर आवाज थोर असा. गाजतसे गहिरु = गंभीरपणानें दुमदुमत होता. लोपी = (नक्षत्रांना = ताऱ्यांना) अभावात्मक करतो. (नक्षत्रनेमि = चंद्र, ध्रुव, विष्णु. नक्षत्रमाला = सत्तावीस मोत्यांची माला, नक्षत्रांची ओळ) (१४५). तुरबंबाळ भंवते = रणध्वनी अद्भुत, ब्रह्मदेवही व्याकुळ झालेला, ते सभोंवार पसरलेलें. तें कौरवदळीं गाजत होते = जे कौरवांच्या सैन्यांमध्यें गर्जत होते. ते हारपोनि गेले नेणो केउते = ते कुठें लपले कोण जाणे–(१४६). अति गहिरे–गजरे–निनादे ( = शब्द, नाद)–निनाद = अति गंभीर (नाम)घोष. देवदत्त आस्फुरिला धनुर्धरें = अर्जुनानें आपला देवदत्त नांवाचा शंख वाजविला (१४७). अचाट दोनी ते शब्द = दोन्ही ते आवाज गंभीर. मीनले एकवाट = एकत्र मिसळले (१४८). विसणैला = क्षुब्ध झालेला. आत्राटिला = (पौंड्र नांवाचा शंख भीमानें) वाजविला (१४९).

पण तेथीलचा तो महत् घोष, थोरपणानेंच कीं गंभीर असा, गाजत आहे कसा म्हणावा तर, त्या थोर अशा घोषामुळें कीं जशा चांदण्या लोपाव्यात सूर्योदयामुळें, तसे ते नाद कौरवसैन्यांमध्यें होत होते, ते लपले, नाहींसे झाले–(१४५)

अनहत रणध्वनि ज्यायोगें ब्रह्मदेवही व्याकुळ झालेला, असे ते रणध्वनि, कौरवांच्या सैन्यामध्यें जे वाजत गाजत होते, ते कुठच्या कुठेंव लपले, नाहींसे झाले, हारपले कीं–(१४६)

त्या निनादानें अतिगंभीर शब्दांनीं नादांनीं अर्जुनानें आपला देवदत्त नांवाचा शंख वाजविला–(१४७)

असे ते दोन्ही शब्द–एक अर्जुनाच्या शंखाचा व दुसरा तो हृषीकेशाचा–ते दोन्ही एकत्र मिळाले. तेथें ब्रह्मांड ब्रह्मकटाह–शतकूट–शतचूर्ण–होऊं पाहात आहे असें झालें–(१४८)

तेव्हां भीमसेन क्षुब्ध झालेला, तो जसा का महाकाळच एक खवळलेला, त्यानें तर आपला महाशंख पौंड्र नांवाचा तो वाजविण्याचें–फुंकण्याचें केलें–(१४९)

अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

[अनन्तविजय = युधिष्ठिराच्या शंखाचें नांव. नकुलाचा सुघोष नांवाचा व सहदेवाचा मणिपुष्पक नांवाचा शंख.]

**अन्वय :** राजा युधिष्ठिरः कुन्तीपुत्रः अनन्तविजयम् (शंखं दध्मुः) । नकुलः सुघोषं शंखं (दध्मौ) । सहदेवः मणिपुष्पकः (दध्मौ) ।

**अर्थ :** कुन्तीपुत्र धर्मराजानें अनन्तविजय, नकुलानें सुघोष, व सहदेवानें मणिपुष्पक नामक शंख वाजविला (१६).

**तो महाप्रळय जलधरु । जैसा घडघडिला गहिरु ।**
**तंव अनन्तविजयो युधिष्ठिरु । आस्फुरित असे ॥ १५० ॥**

**नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु ।**
**जेणें नादें अंतकु । गजबजिला ॥ १५१ ॥**

महाप्रळय जलधरु घडघडिला गहिरु = महाप्रळयाचा मेघ जसा गंभीर असा आकाशीं घडघडणारा. आस्फुरित असे = वाजवितसे (१५०). सुघोषु नांवाचा नकुळाचा शंख. मणिपुष्पक नांवाचा सहदेवाचा शंख (पुष्पक = कुबेराचें विमान). अंतकु गजबजिला (ठाके) = अंतकही त्यामुळें गजबजला–गडबडला–घाबरला होऊन आहे (१५१).

तो महाप्रळयकाळचा मेघच जसा का तसा गंभीरतेनें आकाशीं घडघडला जसा तेथें आतां युधिष्ठिरांनीं आपला अनन्तविजय नांवाचा शंख फुंकिला–वाजविण्याचें केलें–(१५०)

नकुळानें सुघोष नांवाचा शंख वाजविला व सहदेवानें मणिपुष्पक नांवाचा शंख वाजविला–फुंकिला– (१५१)

**काश्यश्च परमेश्वासः शिखण्डी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान् दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥**

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

[ परमेश्वासः, काश्यः, काशिराजः, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अपराजित सात्यकि (१७). द्रुपद द्रौपदीचे सर्व पुत्र महाबाहु अभिमन्यु या सर्व सर्वशः पृथिवीपतीनी, हे राजा, आपआपले पृथक् पृथक् = वेगवेगळे– शंखान् दध्मुः = शंख वाजविले (१८). त्या घोषानें = नादानें–नभश्च पृथिवीं चैव = पृथ्वी व आकाश. तुमुल = घनघोर, युद्धाचा गलबला. व्यनुनादयन् = दाणाणून गेली. धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयन् = कौरवांचीं हृदयें विदीर्ण झालीं (१९) ]

**अन्वय :** परमेश्वासः काश्यः च महारथः शिखण्डी, धृष्टद्युम्न विराट च अपराजित सात्यकिः । (१७)

द्रुपदः द्रौपदेयाः च पृथिवीपती सर्वशः महाबाहु सौभद्रः पृथक् पृथक् शंखान् दध्मुः । (१८)

स तुमुलः घोषः व्यदारयन् धार्तराष्ट्राणां हृदयानि–नभः च पृथिवीं च एव व्यनुनादयन् । (१९)

**अर्थ :** तसेंच, काशिराज परमधनु धारण करणारा, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अपराजित सात्यकी–(१७).

द्रुपद द्रौपदीचे सर्व पुत्र आणि महाबाहु अभिमन्यू या सर्वांनीं, हे राजा, आपआपले वेगवेगळे शंख वाजविले (१८).

त्या तुमुल–घनघोर नादानें पृथ्वी व आकाश दणाणून गेलीं व कौरवांचीं हृदयें विदीर्ण झालीं (१९).

तेथें भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक ।
हा काशिपति देख । महाबाहु ॥ १५२ ॥

तेथें अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु ।
धृष्टद्युम्न नृपनाथु । शिखंडी हन ॥ १५३ ॥

विराटादि नृपवर । जे सैन्यक मुख्य वीर ।
तिहीं नाना शंख निरंतर । आस्फुरिले ॥ १५४ ॥

तेणें महाघोष निर्घातें । शेषकूर्म अवचितें ।
गजबजुनि भूभारातें । सांडुं पाहाती ॥ १५५ ॥

तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार आंदोळत ।
समुद्रजळ उसळत । कैलासवेन्हि ॥ १५६ ॥

पृथ्वीतळ उलथों पाहात । आकाश असे आसुडत ।
तेथें सडा होत । नक्षत्रांचा ॥ १५७ ॥

सृष्टी गेली रे गेली । देवा मोकळवादी झाली ।
ऐसी एक टाळी पिटली । सत्यलोकी ॥ १५८ ॥

दिहाचु दिनु थोकला । जैसा प्रळयकाळ मांडला ।
तेव्हां हाहाःकार उठिला । तिन्ही लोकीं ॥ १५९ ॥

तंव आदि पुरुखु विस्मितु । म्हणे झणें होय अंतु ।
मग लोपला अद्भुतु । संभ्रम तो ॥ १६० ॥

म्हणोनि विश्व संवसरले । येऱ्हवी युगांत होते वोडवले ।
जै महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं ॥ १६१ ॥

तो घोषु तरि उपसंहरला । परि सादा पडिसाद होता राहिला ।
तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ॥ १६२ ॥

जैसा गजघटा आंतु । सिंहलिला विदारितु ।
तैसा हृदयांतें भेदितु । कौरवांचया ॥ १६३ ॥

ते गाजत तव ऐकति । तंव उमेचि हियें घालिती ।
एकमेकांते म्हणती । सावध रे सावध ॥ १६४ ॥

तेथें बळ प्रौढि पुरते । जे महारथी वीर होते ।
तिहीं पुनरपि दळांते । आदरिले ॥ १६५ ॥

तेथें–तेथ (१५२). हन = आणीकही एक (१५३). सैन्यक–सैनिक (१५४). महाघोष निर्घाते (= निर्घात = धक्का, मेघगर्जना, झंझावात) = महाघोषाच्या धक्क्यानें, झंझावातानें, मेघगर्जनेनें. अवचितें = एकाएकीं, न कळत. गजबजोनि–गजबजुनि = गडबडोनि (१५५). आंदोळत–आंदोलित = झोके बसले होत होते, हालत होते. कैलास = कैलास पर्वत. (१) एक पर्वत–शंकर व कुबेर यांचें निवासस्थान, शिवलोक. (२) हिमालय शिखरविशेष. कुबेरस्य उद्यानं चैत्ररथम् । अस्य पुत्रो नलकूवरः । अस्य स्थानं कैलासः । अस्य विमानं पुष्पकम् । अस्यपुर्नगरमू अलका । कैलास ओकस्, कैलासनाथ = १) शंकर, २) कुबेर. सत्यलोक = ब्रह्मदेवाचें स्थान (१५६). आसुडत = तुटून पडत होते जसे, आढले होत होते–ओढले जात होते.

सडा होत = शिंपडली गेली जशी का (१५७). मोकळवाधी = निराधार स्थिति, निराश्रित, अनाथतेची दशा, अवस्था, राहणें, मर्यादा. टाळी पिटली = हाकाटी झाली, आरोळी झाली (१५८). दिहाचि दिनु थोकला = दिवस असून दिवस लोपला (१५९). म्हणे = कदाचित्-होय, न होते. संभ्रम = नादघोष, भ्रांति, धांदल, गौरव, त्वरा, भीति (१६०). संवसरले-सावरले = सावरून धरिले, लोकवस्तीचे केले (१६१). उपसंहरला = थांबला. पडिसाद = प्रतिध्वनि. विध्वंसिला = विनाशाचा, उच्छेदाचा केला (१६२). गजघटा आंत = (गजघट = हत्तींचा कळप) हत्तीच्या कळपांमध्यें. मेदित = भिन्न भिन्न करणें (१६३). गाजत = घुमणारा तो नाद. उमेचि हिये घालिती = एकमेकांना धैर्य देत, हृदयजीवित देत, छाती देत (१६४). बळ प्रौढि पुरते = बळानें व गांभीर्यानें पूर्ण असे. आदरिले = आवरिले (१६५).

तेथें अनेक भूपति होते-ते द्रुपदराजा व द्रौपदेयादि होत, हा काशिपति महाबाहू पाहा-(१५२)

हे नृपनाथ-तेथें अर्जुनाचा सुत अभिमन्यु, अपराजित सात्यकी, धृष्टद्युम्न तसेंच शिखंडीही होता-(१५३)

विराट आदिकरून राजांनीं-जे मुख्य मुख्य असे सैन्यामधील वीर, त्यांनीं आपआपले निरंतरचे असे शंख वाजविण्याचें केलें-(१५४)

त्या महाघोषाच्या झंझावातासारख्या, मेघगर्जनेसारख्या धक्क्यानें-पाताळीचा शेष व कूर्म हे गडबडून जाऊन कदाचित् आपला भूभार सांडूं पाहात होते-(१५५)

तिहीं लोक-स्वर्ग, पृथ्वी व पाताळ हे लोक-डळमळूं लागले; मेरु पर्वत तसेंच समुद्रामधील जो मांदार पर्वत-स्वर्गातील वृक्षविशेष मंदार-त्यांना झोके बसत होते, ते हालत होते; समुद्राचें पाणी उसळ्या घेऊन कैलासही भिडून जात होतें-(१५६)

पृथ्वीतळ उलथून पडूं पाहात होते, आकाश तुटून पडत होते-जसें ओढलें जात होतें-तेथें नक्षत्रांचा सडाच शिंपडला गेला-(पावसाच्या टप्‌टप् मोठ्या थेंबांचा जसा वर्षाव व्हावा-सडाच जसा घातला गेला पृथ्वीवर-(१५७)

देवांची निराधार स्थिति झाली-निराश्रित अशी अनाथतेची अवस्था झाली-तेथें सृष्टि गेली रे गेली असें होऊन होतें-सत्यलोकामध्यें तर एकच अरोळी झाली, हाकाटी झाली, एकच टाळी पिटली गेली-(१५८)

दिवस असूनही दिवस लोपला जसा, असें होत आहे, जसें का, प्रळयकाळच मांडला आहे, येऊन आहे-तिहीं लोकांमध्यें हाहाःकार उठिला गेला असें होत आहे-(१५९)

आतां तर आदिपुरुष भगवान्, वटपत्रीं शयन केलेला, तो अति विस्मित झाला; कदाचित् अंत होय-न होय, असें नंतर लगेच कीं तो नादघोष, धांदल, भ्रांती, भीति, त्वरा ती अद्‌भुततेची ती लोपली-नाहींशी झाली-(१६०)

---

टीप : काश्यः = १) पांडवपक्षीय एक राजा. युद्धांत एकरथीचा अष्टरथी होण्याचा यास वर होता. २) सांदीपनि पिता.

शिखण्डिन् = पु. द्रुपदपुत्र. भीष्माचा सूड उगवण्याकरितां अंबाच शिखंडी झाली-[अंबा = काशीराजाची ज्येष्ठ कन्या. हिला व हिच्या दोन बहिणींना त्यांच्या स्वयंवरकालीं भीष्मानें जिंकून आणलें. पण हिनें शाल्वराजास आधींच मनानें वरल्याचें कळल्यावरून सोडून दिलें. मग शाल्वही ती जिंकली गेल्यानें तिला पत्करीना. शेवटीं भीष्मावर रागावून तिनें तन्नाशार्थ तप केलें व हीच पुढें शिखंडी झाली (म. भा. १-१०६)] हा जन्मल्यानंतर लग्न होईपर्यंत स्त्रीच होता व पुढें एका यक्षास स्त्रीत्व देऊन पुरुष झाला. हा द्रोणापाशीं धनुर्विद्या शिकला, यास पुढें करून अर्जुनानें भीष्मास जर्जर केलें. स्त्रीजात म्हणून भीष्मानें त्याच्यावर शस्त्र धरिलें नाहीं. पुढें तो स्वतः अश्वत्थाम्याकडून मारला गेला.

श्रीकृष्णादींनीं आपआपले शंख फुंकिले त्यायोगेंच कीं विश्व सावरलें गेलें-आवरून धरिलें गेलें. एऱ्हवीं युगांतक एक होत आहे, असें होऊन होतें-(१६१)

तो घोष थांबला, पण ध्वनि प्रतिध्वनि तो होतच होता-त्यायोगेंतर कौरवांचा तो सैन्यभार पार विध्वंसिला गेला, उच्छेदाचा झाला-(१६२)

हत्तींच्या कळपामध्यें सिंह जसा सहज लीलेनेंच विदारण-युद्ध-करणारा, त्याप्रमाणें कौरवांच्या हृदयांचा त्या घोषानें भेद केला गेला. (१६३)

तो ध्वनीचाहि प्रतिध्वनि घोष गाजत होता घुमणारा तो त्यामुळें एकमेकांना धैर्य देत, हृदयजीवित देत, छाती देत असे एकमेकांना म्हणत आहेत कीं, 'सावध रे सावध'-(१६४)

त्या ठायीं बळप्रौढीस पुरणारे जे-बळानें व गांभीर्यानें पूर्ण असे जे महारथी वीर होते त्यांनीं पुन्हा सैन्यास आवरिलें, आदरिलें, सांवरिलें-(१६५)

**अथ व्यवस्थितान् दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥ २० ॥**

[व्यवस्थितान् = युद्धासाठीं व्यवस्थेनें उभे (पाहून)-धार्तराष्ट्राः = धृतराष्ट्राचे पुत्र. कपिध्वजः = अर्जुन. प्रवृत्ते शस्त्रसंपाते = शस्त्राचा आघात करण्यास शत्रु प्रवृत्त होणार असें पाहून. धनुरुद्यम्य = आपलें धनुष्य उचलून.]

**अन्वय :** अथ कपिध्वजः शस्त्रसंपाते प्रवृत्ते धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा पाण्डवः धनुः उद्यम्य ।

**अर्थ :** हे धृतराष्ट्रा-कौरव-युद्धासाठीं व्यवस्थेनें उभे राहिलेले पाहून आणि शस्त्राचा आघात करण्यास प्रवृत्त होणार असें पासून, ज्याच्या रथाच्या ध्वजेवर मारुती आहे अशा पांडवानें आपलें धनुष्य उचलून....(२०).

**मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले ।**
**तया दंडीं क्षोभलें । लोकत्रय ॥ १६६ ॥**

**तेथें बाणवरि धनुर्धर । वर्षताति निरंतर ।**
**जैसें प्रळयांत जळधर । अनिवार कां ॥ १६७ ॥**

---

**टीप :** धृष्टद्युम्न = द्रुपदपुत्र. यज्ञाच्या वेळीं अग्निकुंडांतून उत्पन्न झालेला. पांडवांचा सेनापति. यानें द्रोणाचार्यांचा शिरच्छेद केला. पुढें तो निजला असतां त्यास अश्वत्थाम्यानें मारिलें.

विराट = मत्स्यदेशाचा राजा. पांडव अज्ञातवासांत वेषांतरानें याच्याच आश्रयास राहिले होते. यास उत्तर इत्यादि चार पुत्र होते व उत्तरा नांवाची कन्या होती. उत्तरा अभिमन्यूची भार्या झाली. हा भारतीय युद्धांत द्रोणाच्या हातून मारला गेला. याची राजधानी विराटपुर-हल्लींचें वैरात-जयपूरच्या उत्तरेस ४१ मैलांवर.

सात्यकि-अपराजित = यदुकुलोत्पन्न सत्यकाचा पुत्र. मोठा योद्धा. हा कट्टा पांडवपक्षीय होता.

द्रुपद = पुरुकुलोत्पन्न अजमीदवंशीय पृषत् राजाचा पुत्र. पांचाल देशाचा राजा. द्रोणाचा गुरुबंधु. द्रोणाचा पिता भारद्वाज हा दोघांचाहि गुरु. यास द्रौपदी नांवाची कन्या व धृष्टद्युम्न, शिखंडी, इत्यादि ६ पुत्र होते. याच्याकडे धनयाचनार्थ द्रोण गेला असतां त्याचा यानें फार अपमान केला. म्हणून यास द्रोणानें अर्जुनाकडून बांधवून आणविलें व त्याचें अर्धें राज्य घेऊन त्यास सोडून दिलें. त्या रागानें यानें यज्ञ करून द्रोणास मारणारा धृष्टद्युम्न मिळविला. युद्धांत द्रोण याच्या हातून मेला. यानें माकंदी, छत्रवती, कांपिल्य, अहिच्छत्रा, इत्यादि नगरें वसविलीं.

**तें देखिलिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें ।**
**मग संभ्रमे दिठि सैन्यें । घालितसे ॥ १६८ ॥**

**तंव संग्रामी सज्ज जाले । सकळ कौरव देखिले ।**
**तंव लिला धनुष्य उचलिले । पांडुकुमरें ॥ १६९ ॥**

सरिसेपणें = तयारीनें, एकदम. उठावले = उठावदार झालें, सज्ज झालें. दुणवटोनि उचलले = दुप्पट अवसानानें क्षुब्ध झालेलें. तया दंडी क्षोभले लोकत्रय = त्या युद्धास सज्ज झालेल्या सैन्याच्या योगानें तिन्ही लोक क्षुब्ध झालेले. दंडी = चतुरंगसैन्य हलल्यामुळें (१६६). तेथें बाणवरि = बाणावर बाण. निरंतर = दाटपणानें, निबिडतेनें. वर्षत आहेत = वर्षाव–वृष्टि करीत आहेत. प्रळयांत = अंतःप्रलय. जळधर = मेघ. अनिवार = नच अटकाव केलेले; दूर होणारे नव्हत (१६७) संभ्रमे सैन्यें दिठि घालितसे = भ्रांतीनेंच, धांदलीनेंच, त्वरेनें सेना पाहूं लागला. देखिलिया = पाहून पाहणें. संतोष मनें घेऊनि = मनानें तृप्तीचा होऊन (१६८) सज्ज जाले = तयार झालेले. लीला धनुष्य = क्रीडेनें सहज विलास, अनायासें (लीला धनुष्य = कामचेष्टा, मदनधनु) (१६९).

मग पूर्वतयारीनें एकदम उठावदार झालेलें, सज्ज झालेलें तें सैन्य–तेथें तर तें दुप्पट अवसानानें क्षुब्ध झालेलें तें चतुरंग सैन्य–हलल्यामुळें तेथें तिन्ही लोक क्षुब्ध झालेले–(१६६)

बाणांवर बाण, बाणांचा वर्षाव, बाणांची वृष्टि निबिडपणें वर्षत आहेत, तेथचे योद्धे ते जसें का, प्रळयकाळचे–प्रळयाच्या अंतींचे मेघ ते एकसारखे वर्षणारे–ते नच आवरणारे–ते दूर होणारे नव्हतच–(१६७)

अर्जुनाने तें पाहून त्याच्या योद्धयाच्या मनास तृप्ति, तुष्टि, संतोष झाला; व मग त्यानें सहजच, धांदलीनेंच, त्वरेनेंच कीं ती सेना तो पाहूं लागला, पाहण्याचें केलें–(१६८)

युद्धाकरितां सज्ज झालेले सकळ कौरव त्यानें पाहिले–देखिले, तेव्हां तर सहज लीलेनेंच जसें का, पांडुकुमर अर्जुनानें आपलें (लीला) धनुष्य उचलिलें–धनुष्य उचलून. . . .(१६९)

**हृषीकेशं तदा वाक्यम् इदमाह महीपते ।**
**अर्जुन उवाच–सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥**

[वाक्य = वचन. इदम् आह = हें बोलिला. रथं स्थापय = रथ नेऊन उभा करावा. उभयोः सेनयोः मध्यें = दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं].

**अन्वयः** महीपते–तदा हृषीकेशं इदं वाक्यं आह । अर्जुन उवाच– । उभयोः सेनयोः मध्ये मे रथं हे अच्युत स्थापय ।

**अर्थः** हे राजा, तेव्हां अर्जुन, श्री भगवान श्रीकृष्णास असें म्हणाला कीं–हे अच्युता, हा माझा रथ दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा करावा (२१).

**ते वेळी अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरि रथु पेलावा ।**
**नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळा ॥ १७० ॥**

पेलावा = प्रेरावा, लोटावा, पुढें न्यावा (१७०).

त्यावेळेस अर्जुनानें म्हणूं केलें कीं–अहो देवा ! आता रथ हा झपाट्यानें पुढें न्यावा व पुढें नेऊन तो दोन्हीहि दळांच्या मध्यभागीं उभा करावा कीं– (१७०).

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यम् अस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥**

[ योद्धुकामान् = लढण्याची इच्छा करणारे. अवस्थितान् = उभे असलेल्यांना. मया कैः सह योद्धव्यम् = मी कुणाबरोबर तें लढण्याचें पाहावें-करावें. रणसमुद्यमे अस्मिन् = ह्या रणसंग्रामाचे ठायीं आरंभ तो कसा करावा, दीर्घ प्रयत्न तो, का कार्य तें, का काम तें कसें पाहण्याचें करावें. रणसम् = ( रण् = शब्द करणें. रण = शुद्ध शब्द )-कुल = घोर युद्ध. उद्यमे = उद्योग, मेहनत. सम् = जमाव, बरोबर, सुंदरपणा इत्यादि अर्थी. उद्यम = उचलणें, यत्न, उद्योग, तयारी. ]

**अन्वय :** एतान् योद्धुकामान् अवस्थितान् यावत् अहं निरीक्षे । अस्मिन् रणसमुद्यमे मया कैः सह योद्धव्यम् ।

**अर्थ :** ह्या युद्धासाठीं उभे असलेल्या-सज्ज झालेल्यांना तोंपर्यंत मी निरीक्षिण्याचें करीन कीं, ह्या रणसंग्रामाचे ठायीं-रणभूमीवर कुणाबरोबर तें लढण्याचे तें व्हावें; येथें कुणाबरोबर युद्ध करावें लागणार, तें मला समजलें पाहिजे-(२२).

**जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक (सैन्यक) ।**
**न्याहाळीन अशेख । जुंझते जे ॥ १७१ ॥**

नावेक = क्षणभर. सैनिक, सैन्यक = योद्धे. अशेख = सर्व.

जे का मी क्षणभर हे सर्व वीर सैन्यांमधले ते-जुंझण्यास आलेले ते कसे जुंझते आहेत, तें न्याहाळीन-पाहीन-(१७१)

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेः युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

[ अव + ईक्ष् = काळजी घेणें. अनु + इष् = पीडणें. पर्यालोचन करणें-अन्वेक्ष-अन्वेव-वेक्ष × वेख × वेष ×. अवेक्षणं ( क्षा ) क्षितं = पाहणें, देखरेख संरक्षण इत्यादि काळजी, आदर, करार, कृपा. योत्स्यमानान् = युद्ध करण्याची इच्छा करणारे-लढूं इच्छिणारे. युयुत्सु, युयुधान = लढूं इच्छिणारा क्षत्रिय योद्धा. योत्स्यमानान् = युद्ध करण्याकरितां. दुर्बुद्धे = अधर्मनिष्ठ. धार्तराष्ट्रस्य = दुर्योधनाच्या. युद्धे प्रियचिकीर्षवः = युद्धामध्यें हित करण्याच्या इच्छेनें. एते अत्र समागताः = जे येथें आले आहेत. ]

**अन्वय :** अहं अवेक्षे ये एते अत्र समागताः योत्स्यमाना दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य युद्धे प्रियचिकीर्षवः ।

**अर्थ :** दुर्योधन दुर्बुद्धि-त्याचें हित करण्याच्या इच्छेनें जे येथें आहेत, त्यांना मी पाहून घेतों (२३.)

**येथें आले असती आघवे । परि कवणेसी म्या जुंझावे ।**
**हे रणीं लागे पाहावे । म्हणोनियां ॥ ७२ ॥**
**बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव ।**
**वांटिवावीण हांव । बांधती जुंझी ॥ १७३ ॥**
**जुंझांची आवडी धरिती । परि संग्रामीं धीर नव्हति ।**
**हें सांगोनि रायाप्रति । संजयु म्हणे ॥ १७४ ॥**

आघवे-अघवे. म्हणोनियां-म्हणउनिया (१७२). वांटिवावीण जुंझी हाव (धरिती) बांधती = पुरुषार्थ-पराक्रमाशिवायच युद्धाची हांव, पोकळ डौल करितात (१७३). धीर नव्हति = स्थिर गंभीर नसतात, असत नाहींत (१७४).

येथें अवघे सर्व आले आहेत–पण मी कुणाबरोबर युद्ध करण्याचें आहे, का करावें–म्हणून तें रणांगणामध्यें पाहावें लागत आहे–(१७२)

बहुतकरून कौरव हे आतुर व दुःस्वभावाचे! ते पुरुषार्थ व पराक्रमाशिवायच युद्धाची हांव, पोकळ डौल जुंझाचे ठायीं बांधतात–(१७३)

जुंझाची आवड धरितात, पण संग्रामामध्यें धीर असत नाहींत–हे रायाप्रत सांगून संजय तो रायाप्रत बोलिला.... (१७४)

**संजय उवाच।**

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्॥ २४॥**

[गुडाकेशेन=निद्रेचा स्वामी अर्जुन. सेनयोः उभयोः मध्ये=दोन्ही सैन्यांच्यामध्यें.]

**अन्वय:** उवाच संजयः—भारत, उभयोः सेनयोः मध्ये उत्तमम् रथम् स्थापयित्वा, गुडाकेशेन एवं उक्तः।

**अर्थ:** संजयानें म्हटलें कीं–हे धृतराष्ट्रा, अर्जुनानें श्रीकृष्णाला असें सांगितल्यावर, त्यानें तो रथ दोन्हीं सैन्यांच्यामध्यें नेऊन उभा केला (२४).

**आईके अर्जुन इतके बोलिला। तंव श्रीकृष्णें रथु पेलिला।**
**दोही सैन्यामाजीं केला। उभा तेणें॥ १७५॥**

एवढें अर्जुन बोलिला न बोलिला तोंच श्रीकृष्णांनीं तो रथ पेलून दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं उभा केला–(१७५)

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्।**
**उवाच पार्थ पश्यैतान् समवेतान्कुरूनिति॥ २५॥**

[प्रमुखतः = समोर. महीक्षिताम् = राजांच्या समोर. समवेतान् कुरून् पश्य=ह्या एकत्र जमलेल्या कौरवांना पाहा.]

**अन्वय:** भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां महीक्षितां च इति उवाच पार्थ एतान् समवेतान् कुरून् पश्य।

**अर्थ:** भीष्मद्रोणादिकांच्या व सर्वांच्या समोर नेऊन श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें कीं, हे जमलेले कौरव पाहा–(२५).

**जेथें भीष्मद्रोणादिक। जवळिकेचि सन्मुख (सद्मुख)।**
**पृथिवीपति अनेक। बहुत आहाती॥ १७६॥**

जवळिकेची=नात्याचे, जवळचे. अनेक-आणिक. (१७६).

जेथें भीष्मद्रोण आदिकरून अगदीं जवळच्या नात्यांतले सन्मुख झालेले, पृथिवीपति आणीक पुष्कळसे होते.... (१७६)

**तत्रापश्यत् स्थितान् पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥**

**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।**
**तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बधूनवस्थितान् ॥ २७ ॥**

[अपश्यत् स्थितान् = उभे असलेले पाहिले. पितॄन् = चुलते. पितामहान् = आजे. आचार्यान् = गुरु. मातुलान् = मामा. भ्रातॄन् = भाऊ. पुत्रान् = पुत्र. पौत्रान् = नातू. सखीम् = मित्र (२६). श्वशुरान् = सासरे. सुहृदः = इष्टमित्र. समीक्ष्य = पाहून (२७).]

**अन्वय :** पार्थ, तत्र पितॄन् अथ पितामहान् आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् सखीम् तथा ।- (२६)

स कौन्तेयः उभयो सेनयो अपि श्वशुरान् सर्वान् बंधून् अवस्थितान् सुहृदश्च एव तान् समीक्ष्य ।-(२७).

**अर्थ :** त्या दोन्हीं सैन्यांत तेथें चुलते, आजे, गुरु, मामा, भाऊ, पुत्र, नातू, मित्र आणि सासरे, इष्टमित्र उभे आहेत असें अर्जुनास दिसलें—आपले सर्व बांधव युद्धासाठीं तयार असलेले पाहून—(२६-२७).

**तेथ स्थिर करूनियां रथु । अर्जुन असे पाहातु ।**
**तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं ॥ १७७ ॥**

**मग म्हणे देवा देख । हे गोत्रगुरू अशेख ।**
**तंव कृष्ण मनीं नावेक । विस्मो जाला ॥ १७८ ॥**

**तो आपणया आपण म्हणे । येथें काय कवण जाणें ।**
**हें मनीं धरिलें येणें । कांहीं आश्चर्य असे ॥ १७९ ॥**

**ऐसी पुढील से घेतु । तो सहजे जाणें हृदयस्थु ।**
**परि उगा असे निवांतु । तिये वेळिं ॥ १८० ॥**

**तंव तेथें पार्थ सकळ । पितृपितामह केवळ ।**
**गुरू पितृव्य मातुळ । देखता जाला ॥ १८१ ॥**

**इष्टमित्र आपुले । कुमरजन देखिले ।**
**हे सकळ असती आले । तयांमाजीं ॥ १८२ ॥**

**सुहृद्‌जन सासुरे । आणीकही सखेसोइरे ।**
**कुमर पौत्र धनुर्धरे । देखिले तेथें ॥ १८३ ॥**

**जयां उपकार होते केले । कीं आपदीं जे राखिले ।**
**हे असो वडिल धाकुले । आदिकरूनि ॥ १८४ ॥**

**ऐसें गोत्रचि दोहीं दळिं । उदित जाले असती कळिं ।**
**ते अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ १८५ ॥**

संभ्रमेंसीं = त्वरेनें, धांदलीनें, भ्रांतीनें (१७७). कृष्ण मनीं—कृष्णा मनीं. म्हणे देवा देख—देवा म्हणे देख देख. नावेक = क्षणभर (१७८). काय—कायी. कांहीं आश्चर्य—परि कांहीं आश्चर्य (१७९). घेतु—घेत. से = आठवण, स्मरण, स्मृति, सूचना. हृदयस्थु—हृदयस्थ = भगवान् श्रीकृष्ण परमात्मा. उगा असे = निवांतपणें उभा होता, स्वस्थ होता (१८०). गुरू पितृव्य मातुळ—गुरूबंधु मातुळ = (पितृव्य = चुलता). जाला—

जाहला (१८१). कुमरजन = कुमार. इष्ट = अग्निहोत्र, तप, सत्य, वेदरक्षण, आतिथ्य, वैश्वदेव हीं कर्मे (१८२). सासुरे-सासरे. कुमरपौत्र = नातु (१८३). राखिले-रक्षिले (१८४). उदित जाले असती कळि-उदित जाले असे कळी = कलहाला-युद्धाला तयार झाले आहेत (१८५).

तेथें रथ स्थिर केला, रथामधून अर्जुन सहज त्वरेनेंच तो समस्त सैन्यभार पाहत आहे-(१७७)

देवास, श्रीकृष्णास, अर्जुन आतां म्हणत आहे कीं-अहो देवा, पाहा पाहा, हे सर्व गोत्राचे आमचे गुरु-गोत्रगुरु होत कीं-तेव्हां भगवान् श्रीकृष्णाचे मनामध्यें क्षणभर अत्यंत विस्मय झाला, त्यांना आश्चर्य वाटलें-(१७८)

ते स्वतःच स्वतःस म्हणूं लागले कीं-भगवान् स्वतःशींच बोलूं लागला-येथें कुणी वरें जाणावें जें का कांहीं ह्या अर्जुनानें आपल्या मनानें घेतलें आहे-तें पण अहो, येथें तर आश्चर्यच एक आहे-परमविस्मयास येथें जागा आहे जें का-(१७९)

असें जें कांहीं अर्जुनाच्या मनानें घेतलेलें, तेथें पूर्वसूचनाच एक कीं-असें त्यानें घेतलें जें कांहीं आहे, तें अगदीं सहजपणेंच कीं हृदयस्थ तो परमात्मा जाणून आहे, पण त्यानें कांहींहि तेथें बोलण्याचें केलें नाहीं-तो उगाच निवांत राहिला-(१८०)

तेथें तेव्हां पार्थानें सकळ आजे, गुरु, चुलते, वडील नातलग, पुरुष, मामा पाहिले कीं-पाहून राहिला आहे-(१८१)

आपले इष्ट, प्रिय मित्र, (इष्ट = अग्निहोत्र, तप, सत्य, वेदरक्षण, आतिथ्य, वैश्वदेव हीं कर्मे), स्नेही, मुलगे, कुमारसमूह पाहिले, त्यामध्यें हे सकळही कीं आलेले होते-दिसत होते-(१८२)

मित्र, पक्षपाती, सासरे आणीक दुसरे सखे, सोयरे, पौत्र नातू कुमर-मुलांचींहि मुलें-अर्जुनानें तेथें पाहिले देखिले-(१८३)

ज्याच्यावर उपकार केले होते अथवा ज्यांना संकटसमयीं राखिलें-सांभाळिलें होतें, असे हे असो, तेथें तर वडील काय, धाकटे काय, असे सर्वही होते-(१८४)

असें गोत्रच एक दोन्हीं सैन्यांमध्यें युद्धाला-भांडण कलहाला-भांडणाला तयार झालें आहे, असें अर्जुनानें त्यावेळीं पाहिलें-अवलोकिलें-(१८५)

**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।**
**अर्जुन उवाच—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**

[कृपया = दयेनें. परया = पुष्कळशा. आविष्टः = संचरलेला. विषीदन् = अनुत्साह, मनोभंग खेदाचा होऊन. इदं अब्रवीत् = असें बोलिला. स्वजनं = भाऊबंद. युयुत्सुं समुपस्थितम् = युद्ध करण्यास इच्छिणारे-सज्ज झालेले, हजर झालेले आहेत.]

**अन्वय :** (पार्थ) परया कृपया आविष्टः विषीदत् अब्रवीत् इदम् । हे कृष्ण । इदं स्वजनं समुपस्थितम् युयुत्सुं दृष्ट्वा ।

**अर्थ :** अतिकारुण्यानें व्यापिलेला आणि खिन्न होतसाता अर्जुन पुढील वाक्य बोलिला—अर्जुन म्हणाला, हे कृष्णा माझे आप्तजन युद्धासाठीं एकत्रित झालेले पाहून.... (२८).

तेथें मनीं गजबज जाली । आणि आपैसी कृपा आलि ।
तेथें (अपमानें निघाली) अभिमानें गेली । वीरवृत्ति ॥ १८६ ॥

जिया उत्तम कुळिचिया होति । आणि गुणलावण्य आथि ।
तिया आणिकीते न साहाति । सतेजपणें (सुतेजपणें) ॥ १८७ ॥

नवियें आवडीचेनि भरें । कामिकु निज बनिता विसरे ।
मग पाडेंविण अनुसरे । भ्रमला जैसा ॥ १८८ ॥

कां तपोबळें ऋद्धि । पातलिया भ्रंशे बुद्धि ।
मग तया विरक्तातें सिद्धि । आठवेना ॥ १८९ ॥

तैसें अर्जुनातें जाले । असते पौरुषत्व गेले ।
जे अंतःकरण दि्धले । कारुण्यासी ॥ १९० ॥

देखा मंत्रज्ञु बरळु जाय । तेथें जैसा संचारु होय ।
तैसा धनुर्धर महामोहे । आकळिला ॥ १९१ ॥

म्हणोनि असता धीरु गेला । हृदया द्रावो आला ।
जैसा चंद्रकरीं शिवंतला । सोमकांतु ॥ १९२ ॥

तयापरि पार्थु । अतिस्नेहें मोहितु ।
सखेद असें बोलतु । अच्युतेसी ॥ १९३ ॥

तो म्हणें अवधारीं देवा । म्यां पाहिला हा मेळावा ।
तंव गोत्रवर्गु आघवा । देखिला येथें ॥ १९४ ॥

हे संग्रामी अति उद्धत । जाले असती कीर समस्त ।
मग आपणया उचित । केवि होय ॥ १९५ ॥

तेथ मनीं गजबज जाली = मनाची लाही–तगमग झाली. आपैसी = आपोआपच. कृपा (उपजली) आलि = दया जन्मली–प्रगट झाली. तेणें (अपमानें निघाली) अभिमानें गेली वीरवृत्ति ( = सन्मान) = पार्थाचे चित्त दयेनें घेरल्यामुळें वीरवृत्ति ती रागावून जाऊन–रागानें निघून गेली (१८६). उत्तम कुळिचिया गुणलावण्य आथि तिया सतेजपणें (सुतेजपणें) आणिकीते न साहाती = कुलीन लावण्यवतीला आणीक दुसरी सवत सहन होत नाहीं. सतेज = शोभिवंत. सुतेज = प्रभुत्व असणें (१८७). नवियें आवडीचेनि भरें = नव्या पसंतीच्या–आवडीच्या भरानें. कामिकु निज वनिता विसरे = विलासी मनुष्य आपली पत्नी–कामुक स्त्री विसरतो. भ्रमला जैसा पाडेंविण अनुसरे = खालच्या दर्ज्याच्या, योग्यतेच्या स्त्रीला अनुसरतो–सोबती करतो–सेवक होतो (१८८). तपोबळें ऋद्धि पातलिया भ्रंशे बुद्धि = तपश्चर्येच्या बळावर संपत्ति आली असतां बुद्धि भ्रंश पावते. मग तया विरक्तातें सिद्धि आठवेना = मग तया निस्पृहास, अनिच्छेस, वैराग्ययुक्तास साधन सिद्धीचें करणें तें तर मुळींच आतां दूर झालें असें होतें–तेथें मुळींच कांहींहि आठवणच कीं ह्या साधन सिद्धिसंबंधींची ती मुळीं आठवणीची होत नाहीं (१८९). तैसें अर्जुनातें जाले–असते पौरुषत्व गेले–पुरुषत्व गेलें, कारुण्यासी अंतःकरण दिधले = अंतःकरणांत कारुण्यच एक–दयाच एक–उगवली–वीरवृत्तीचें स्थान दयेस मिळालें (१९०).

मंत्रज्ञु = मंत्र योजणारा, बरळु जाय = चुकतो, प्रमाद करतो. संचारु = भूतसंचार. धनुर्धर महामोहे आकळिला = अर्जुन तर महामोहानेंच–मोठ्या भ्रांतीनेंच–चुकीनें कीं आटोपला गेला (१९१). असता धीरु गेला = मूळचा असलेला तो धीर, गंभीरपणा, सहनशीलता, शांत स्वभाव हरपला. हृदया द्रावो आला =

हृदय पाझरलें, वेगास आलें. सोमकांत चंद्रकरी शिवंतला = चंद्रमणि चंद्रकरी वितळला–चित्ताकर्षक झाला (१९२). अतिस्नेहें मोहितु = अतिशय प्रेमाच्या ओलाव्यानें मतिभ्रमाचा झाला. सखेद = श्रमाचा होऊन, शोकास येऊन, थकवा आलेला असा होऊन, दुबळेपणाचा होऊन (१९३). अवधारीं = विचारांत घ्या. गोत्रवर्गु = कुळ, वंश, नांव, समुदाय, ऋषिवंश, कुळजातीय वस्तुसमूह. मेळावा = वीरसमुदाय (१९४). संग्रामी अति उद्धत–संग्रामी उदित = (उद्धत = बाहेर टाकलेले, उचललेले, पसरलेले. उदित = बोललेले, उंच, उन्नत, उगविलेले, जागे झालेले, ख्यात) हे संग्रामी–लढाईमध्यें–पसरलेले का उन्नत असे झाले आहेत (पण येथें आमची ती सोय कशी लागणार तें)–(१९५)

तेथें मनाची तगमग झाली व मग आपोआपच दया प्रगट झाली; अर्जुनाचें चित्त दयेनें घेरल्यामुळें–त्या अपमानामुळें–वीरवृत्ति अर्जुनास सोडून गेली, ती रागानें निघून गेली–(१८६)

ज्या कुलीन लावण्यवती, त्यांना आपल्या शोभिवंततेपुढें का प्रभुत्वापुढें आणीक दुसरी तशी सवत सहन होत नाहीं–(१८७)

नव्या आवडीच्या पसंतीमुळें, भरामुळें, विलासी (कामुक) मनुष्य आपली पत्नी–स्त्री–विसरतो व मग भ्रमलाच जसा होऊन, स्वतःचें महत्त्व विसरून, आपल्याहून खालच्या दर्ज्याच्या योग्यतेच्या स्त्रीला अनुसरतो–सोबती करतो–तिचा सेवक होतो–(१८८)

तपाच्या बळावर संपत्ति आली असतां बुद्धि भ्रंशते व मग त्या वैराग्यबळास कुठची ती साधनसिद्धतेची ती सिद्धि आठवणारी! (१८९)

तसें अर्जुनास तेथें झालें. अंगचें मूळचें असलेलें तें पुरुषत्व–पौरुषत्व–नाहींसे झालें; कारण काय तर, वीरवृत्तीचें स्थान दयेनें नेलें म्हणून कीं अंग हृदय करुणा स्पंदतेचें केलें म्हणून–(१९०)

मंत्र योजणारा जेव्हां मंत्र बरळूं लागतो, मंत्र चुकतो, मंत्र म्हणतांना प्रमाद करतो, तेथें मग जसा का भूतांचा संचार कीं त्याचे ठायीं दिसून येणारा, तसा अर्जुन, मोठ्या भ्रांतीने, चुकीनेंच कीं आटोपला गेला–भारला गेला–(१९१)

त्याच्या ठायीं मूळचा असलेला तो धीरगंभीरपणा, सहनतेचें शील, शांत स्वभावाचें दृश्य हरपलें–हृदयास पाझर फुटला, हृदय पाझरलें, वेगास आलें; जसा, चंद्राच्या किरणांनीं सोमकांत चंद्रमणि चित्ताकर्षक झाला, वितळला–(१९२)

त्याप्रमाणें पार्थ, प्रेमाच्या अतिशयतेच्या ओलाव्यानें मतिभ्रमाचा झाला व थकवा आलेल्या श्रमाचा होऊन, शोकास येऊन, दुबळेपणा होऊन, श्रीअच्युतांना म्हणत आहे कीं–(१९३)

अर्जुन म्हणतो—अहो देवा, विचारांत घ्या. म्यां हा वीरसमुदाय पाहिला. येथें तर गोत्रवर्ण, कुळवंश, जातीय समुदायच कीं एक देखिला, पाहिला–दिसत आहे कीं समस्त–(१९४)

हे लढाईमध्यें बाहेर टाकलेले, उचलिलेले, पसरलेले, उंच उन्नत असे झाले आहेत; पण आतां येथें आपणास तें, सद्यःप्रसंगास उचिततेचें होणें तें कसें बरें होईल तें!–(१९५)

**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

[सद (सीद) = गळाठणें, खचणें, खाली पडणें, बुडणें, क्षीण होणें, धीर खचणें, नाश, ऱ्हास, क्लेश पावणें. सीदन्ति = (व्यथित) गांजलेलीं, पीडलेलीं गात्रें गळत आहेत. (सिदणें = दुःख पावणें, नाश पावणें). गात्राणि = शरीर व शरीराचे अवयव. मुखं च परिशुष्यति = तोंड वाळून जात आहे, कोरडें होत आहे, शोषून

घेतलें जात आहे, कृश होत आहे. वेपथुः = (वेपन्) = थरकांप. शरीरे मे रोमहर्षश्च जायते = (माझ्या शरीराचे ठायीं) हर्षानें किंवा भीतीनें अंगावरचे केस ताठ उभे राहत आहेत ते-असें होत आहे-]

**अन्वय :** मम गात्राणि सीदन्ति। परिशुष्यति मुखं। च। वेपथुः। च। मे शरीरे रोमहर्षः जायते।

**अर्थ :** माझीं गात्रें व्यथित होत आहेत. तोंडाला कोरड पडली आहे. माझें शरीर चळचळ कांपत आहे. अंगावर रोमांच उभे राहिले आहेत-(२९).

**येणें नांवें नेणों काई। मज आपणपें सर्वथा नाहीं।**
**मन बुद्धि ठाई। स्थिर नव्हे ॥ १९६ ॥**
**देखें देह कांपत। तोंड असें कोर (कोरडें) होत।**
**विकळता उपजत। गात्रांसी ॥ १९७ ॥**

येणें (नांवेचि) नावें नेणों काई = स्वजनांबरोबर, गोत्रजांबरोबर, युद्ध करावयाचें-लढणें तें असें बोलणें नको-असें बोलताक्षणींच कीं-मज आपणपें सर्वथा नाहीं = मला आपलेपणानें असणें हेंच येथें सांपडेना-स्वतःचें भानच उडालें, आपलें स्वरूप रूपाचें नच होऊन आहे. मनबुद्धि ठिकाणावर नाहीं-स्वतःचें भानच उडालें आहे. आपले ठायींची अशी मनबुद्धि स्थिर होईना. काई-कायी. नव्हे-नोहे (१९६). देखें देह कांपत = (देखें = पाहा) देह हा कांपत आहे, तोंड असें कोरडें पडत आहे-तोंडचें पाणीच पळालें आहे. गात्रांसी विकळता उपजत = अवयवांच्या ठिकाणीं गळाठा आला आहे (१९७).

येणें नावें नेणों काई-ह्या अर्जुनाचें नांव, ह्या स्वजनांचें नाव, गोत्रजांचीं नावें तींच जशीं का विस्मय उत्पन्न करणारीं झालीं-त्याबरोबरच कीं निंदा ही येणारी-वर स्मृति आली कीं क्रोधास वाव मिळणारा म्हणून, येथें शंकाच मुळीं ती प्रसिद्धीस आणणारा, ती देहधारणा हीच मुळीं लपली-वीरांचें वीरपण लपल्यानें, तेथें साध्या एका नांवावरच कीं एवढें युद्धाचें तें रण मांडलें गेलें-व आतां जशी का ती रणरूपी स्त्री, तिनेंच मुळीं ह्या योद्धयाचें नावच बदललें म्हणा-तो आपलेपणास येईचना-वीरास साजेसें तें त्याचें दुसऱ्यांना विस्मित करणें तें बाजूस झाल्यानें स्वतःच मुळीं आपलेपणास नच आल्यानें विस्मयाचा झाला-आपला दर्जा नच ओळखून आपल्यापरी खालच्या दर्जाच्या वृत्तीसच आलिंगूं लागला-भ्रमांत पडला-देहाएवढेपणासच-नावामुळें तें येणें झाल्यानें त्यास आतां स्व सर्वस्व तें आठवेना, मन बुद्धि हीं ठावाचीं नच झाल्यानें स्थिर होईनात-(१९६)

पाहा कीं देह हा कांपत आहे, तोंड (कोर) कोरडें पडत आहे-गात्रांना विकलता येऊन आहे-(१९७).

**गाण्डीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥**

[गाण्डीव = धनुष्य अर्जुनाचें तें. स्रंसते हस्तात् = हाणून पडत आहे. (स्रंस् = गळणें, पडणें, ढिलें होणें, शिथिल करणें). त्वक् = त्वचा, स्पर्शेंद्रिय-पीडित होत आहे-त्वचा दाहाची होत आहे-अंग जळत आहे-मन हें जसें का भ्रमत आहे, असें झाल्यानें मला उभें राहणें शक्य होत नाहीं.]

**अन्वय :** हस्तात् गाण्डीवं स्रंसते। त्वक् परिदह्यते। च। एवं। मे मनः भ्रमति। इव। अवस्थातुं न च शक्नोमि।

**अर्थ :** अमीचें धनुष्य हातून गळून पडत आहे, सर्वांगास ताप होऊन आहे, मी उभा राहूं शकत नाहीं-मन भ्रांत होत आहे-(३०).

सर्वांगा कांटाळा आला । अति संताप उपनला ।
तेथें विकळ हातु गेला । गांडिवाचा ॥ १९८ ॥
तें न धरत निष्टलें । परि नेणोंचि हांतोनि पडिलें ।
ऐसें हृदय असें व्यापिलें । मोहें तेणें ॥ १९९ ॥
जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण ।
तयाहूनि असाधारण । स्नेहनवल ॥ २०० ॥
जेणें संग्रामी हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला ।
तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजि ॥ २०१ ॥
जैसा भ्रमर भेदी कोडे । भलतैसे काष्ट कोरडे ।
परि कळिकेमाजी सांपडे । कोंवळिये ॥ २०२ ॥
तेथें उत्तीर्ण होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणें ।
तैसें कठिणपण कोंवळेपणें । स्नेह देख ॥ २०३ ॥
हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मयाहि नयेचि आया ।
म्हणौनि भुलविला ऐकें राया । संजयो म्हणे ॥ २०४ ॥
अवधारीं मग तो अर्जुन । देखोनि सकळ स्वजन ।
विसरला अभिमान । संग्रामिचा ॥ २०५ ॥
कैसी नेणों सदयता । उपनली असे चित्ता ।
मग म्हणे कृष्णा आतां । नसिजे येथें ॥ २०६ ॥
माझें अतिशयें मन व्याकुळ । होतसे वाचा बरळ ।
जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥ २०७ ॥

सर्वांगा कांटाळा आला = सर्व अंगावर शहारे आले. (कांटाळा = कांटा, रोमांच). संताप उपनला = क्रोध संताप आला. गांडिवाचा हातु (वेंबळ) गेला = गांडीव धनुष्याचा हात (वेंबळ) ढिला झाला (१९८). न धरत–धरतां येत नाहीं–निष्टलें = हातीं नच धरिलेलें असें आपोआपच हातांतून निसटलें (पण तें हातून पडलें तें कांहींहि मुळींच जाणिवेस आलें नाहीं) असें. मोहें = मतिभ्रमानें, शोकानें. हृदय व्यापिलें = अंतःकरण मन झाकलेलें झालें (१९९). वज्र = इंद्राचें शस्त्र, अतिकठीण. कठिण = [कठिन (सं)] दुःसह, घट्ट, दुर्गम. दुर्धर = असह्य, दुर्निवार. असाधारण = विशेष, असामान्य (हेत्वाभास). अतिदारुण = अतिदुःसह, कठोर, कठीण, निर्दय, तीव्र, (क्रौर्य) भयानक रस–माझें अंतःकरण वज्राहूनही कठीण असून त्याहूनही स्नेह हा मोठा कठीण आहे-स्नेहनवल = प्रेम, ओलावा. स्नेह = प्रेमा, प्रियता, हार्दम्, प्रेम, स्नेह इति ५ प्रेम्णः। (अमर०). नवल = नवलाव, कौतुक, अपूर्वपण, नव्हाळी, नवाई (२००).

हरु = श्रीहर, महादेव. जिंतिला = जिंकिला. निवातकवचांचा ठावो फेडिला = निवातकवच = प्रऱ्हादाचा भाऊ संऱ्हाद याचे हे पुत्र; यांचा अर्जुनानें मागमूस नाहींसा केला. मोहें कवळिला = मोहानें आकळिला, त्वरितच की–अगदींच थोड्या वेळांत की. (मोहित करणें = वळवणें, गोंजारणें, अमक्याकडे वळणें, मोहरणें) (२०१). कोडे = इच्छा, आवड. (कोवळिये) कळिका = कमलाची कोंवळी कलिका (२०२). उत्तीर्ण होईल प्राणें = मरून जाईल. कठिणपण कोंवळेपणें स्नेह देख = कोंवळेपणानें स्नेह हा कठीण–दुस्तर होय (२०३). आदिपुरुषाची माया = ममता, आई (माया मांगीण). आदिपुरुष = विष्णु, कृष्ण. ब्रह्मयाहि नयेचि आया = (अटकळ) ब्रह्मदेवालासुद्धां कांहीं अटकळ बांधतां येणार नाहीं तीसंबंधीं. भुलविला = मोहित केला गेला (२०४). स्वजन देखोनि संग्रामिचा अभिमान विसरला = स्वजन, भाऊबंध हे सकळ तेथें पाहून—संग्राम =

लढाई-अभिमान = प्रमाण, प्रेम, गर्व, मीपणा, ज्ञान विसरला = सोडला, पसरला गेला (२०५). सदयता = दयायुक्तता. नसिजे येथें = येथें असूं नये (२०६). मन व्याकुळ = मन विव्हळ, भयभीत. वाचा होतसे बरळ = तोंड हवें तें बरळूं लागतें. वधावे हे सकळ येणें नांवें = ह्याच्या नांवामुळेंच जर वधण्याचें तर मग-(२०७).

सर्वांगावर शहारे आले, अतिशय संताप आला, त्यामुळें धनुष्याचा हात आपोआपच ढिला पडला-(१९८)

धनुष्य तें नच धरताहि हातून निसटलें, हातून पडलें, असेंहि म्हणतां येईना-हातून पडलें किंवा कसें तें कांहीं सांगतां येत नाहीं असें अंतःकरण, मन त्याचें तें त्या मोहानें, भ्रांतीनें, अज्ञानरूपी दुःखानें व्यापलें गेलें-(१९९)

जें हृदय इंद्राच्या आयुधापेक्षांही कठीण (काठीण्यामध्यें वज्र हें फार प्रख्यात आहे)-तें अति दुर्निवार, असह्य, अतिदुःसह, अति कठीण, त्याहिपेक्षां येथें तर हें स्नेहरूपी नवलविशेष असें, असामान्य असें, जास्त कठीण आहे. (स्नेहधवल = प्रेम, लोभ, सुंदर हंस, जोंधळा. धवलिमा-धवलिमन् = पांढरेपणा, फिक्केपणा) -(२००)

ज्यानें लढाईमध्यें प्रत्यक्ष श्रीशंकर (-अग्नि-) जिंकला-प्र्ऱ्हादाचा भाऊ संऱ्हाद याचे पुत्र निवातकवच नांवाचे ते जिंकले-त्यांचा मागमूसही नाहींसा केला-तो अर्जुन आतां तर एका क्षणामध्येंच कीं मोहानें आकळिला गेला-(२०१)

ज्याप्रमाणें भुंगा-भ्रमर-हा भलतेसेंही कोरडें काष्ठ हो, तरी तो तें सहज इच्छेनेंच का आवडीनेंच कीं भेदतो-फोडतो-भोंक पाडिलें होतें-नाशतो, (भेदिर = वज्र) पण कमळाच्या कोंवळया कलिकेमध्यें सांपडतो, बंद केला होतो-(२०२)

तेथें त्या कमलकलिकेमध्यें, तो भ्रमर तर मरून जाईल (प्राणें उत्तीर्ण होईल), पण तें कमळाचें पान कांहीं चिरूं शकणार नाहीं, तसें कोंवळेपणामुळें स्नेह हा कठीण-तर पाहा! (प्रेमामुळें भुंगा कोंवळया कमल-कलिकेंत अडकलेला तो मरून जाईल, पण ती कमलकलिका चिरून तो बाहेर येणार नाहीं)—तैसें स्नेह कोंवळेंपणें देख-(२०३)

ही आदिपुरुष जो भगवान विष्णु-श्रीकृष्ण त्यांची ही ममता-आई ती तर तेथें, अहो ब्रह्मदेवासही कांहीं अटकळ बांधतां येणारी आहे अशी नव्हे-आणि म्हणूनच कीं, हा अर्जुन मोहित केला गेला कीं-हे राया ऐकावें, ऐकण्याचें करावें येथें तें-(२०४)

लक्षांत घ्या कीं, मग तेथें तो अर्जुन, आपुलेंच कीं हे सकळ बांधव, बंधुजन कीं येथें मिळालेले-एकत्र झालेले तें पाहून, त्याचा लढाईसंबंधींचा तो गर्व, मीपण (तो) पार विसरला-त्यानें लढाईचा अभिमान सोडला-तो त्याचा अभिमान उत्कृष्ट युद्धकौशल्यसंबंधींचा, तर आतां जसा तो का, त्या लढाईस आलेल्यामध्येंच कीं पसरला गेला-(२०५)

आम्हीं कांहींच सांगूं शकत नाहीं कीं, तेथें त्याच्या-अर्जुनाच्या-चित्तास कशी ती दयायुक्तता आली, उपजली, व त्यामुळें तो म्हणूं लागला कीं-हे श्रीकृष्णा, आतां आपण येथें नसावें हेंच बरें (दिसतें)!-(२०६)

माझें मनच आधिक्याचें-अतिशयपणाचें होऊन आहे-माझ्या मनाचा व्यापार हा अतिव्याकुळतेचा असा, माझें अंतःकरण, माझी बुद्धि ही अधिकतेनें विव्हळ-व्याकुळ झाली आहे, वाचा हवें तें बरळूं लागत आहे; कारण काय तर त्याचा ह्या नांवामुळेंच कीं हे सकळ वधावेत ते-ह्याच्या नांवामुळेंच जर वध, आघात, ताडण, नाश करणें तर मग...... (२०७)

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**
**नच श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

[निमित्तानि विपरीतानि पश्यामि = विरुद्ध उलटच कीं निमित्त, शकुन मला दिसत आहेत (दृश्). श्रेयः नच अनुपश्यामि = मला कांहीं श्रेय, कल्याण, मोक्ष दिसत नाहीं–. स्वजनं आहवे हत्वा = बंधुजन युद्धामध्यें (अहव) नाशून. आहव = यज्ञ, युद्ध. आहवनीय = होमानिमित्त संस्कृत केलेले अग्नि.]

**अन्वय :** केशव, निमित्तानि विपरीतानि पश्यामि । स्वजनम् आहवे हत्वा । श्रेयः नच अनुपश्यति ।

**अर्थ :** हे केशवा, मला तर दुश्चिन्हें दिसत आहेत, जें का–आपल्याच लोकांना आपण मारल्यानें हित होईल, असें मला वाटत नाहीं (३१).

**या कौरवां जरि वधावें । तरि युधिष्ठिरादिकां कां न वधावे ।**
**हे येर येर आघवे । गोत्रज आमुचे ॥ २०८ ॥**

**म्हणौनि जळो हे झुंझ । प्रत्यया न ये मज ।**
**येणें काय काज । महापापें ॥ २०९ ॥**

**देवा बहुती परी पाहतां । येथें वोखटें होईल झुंझतां ।**
**वर कांहीं चुकवितां । लाभु आथि ॥ २१० ॥**

वधावे (वध = मरण)–मारावे. येर येर आघवे = दुसरें तिमरें परस्पर सर्व. गोत्रज = एकाच वंशात झालेले [(वंश = वंश, कुळी, शेत, शरीर). (वध = नाश, वध, मारणें, अटकाव, निषेध, भिकारी करणें, हद्दपार करणें, पूर्ण त्याग, दुखविणें, युद्ध, हिंसा, पीडा, घुसळणें, टाकणें, स्पर्श, आलिंगन, घात इत्यादि इत्यादि.) संज्ञा = नांव, खूण, बुद्धि] (२०८). (जाळिते तेही जळे) जळो = नकोच हे. प्रत्यया = विश्वास, प्रतिज्ञा, कीर्ति, निश्चय, आचार, (नाम, धातू यापुढें लागणारें अक्षर). महत् = मोठें, श्रेष्ठ. पाप = पातक, अधर्म, दुष्कर्म, अपाय. काज = कारण, हेतु. काय = देह, समूह. झुंझ = युद्ध (२०९). वोखटें = वाईट. (गोमटें = चांगलें). कांहीं चुकविता लाभु आथि = चुकविण्याचें केलें तर जीविताचा लाभ होईल. (हाजी मार्ग चालता। पुढां सिंह जाला अवचिता । तरि तो चुके चुकविता । लाभ आथी ॥ १–२३९ (२१०).

या कौरवांना वधावें तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें?–हे तर परस्पर आमुचे गोत्रजच ना!–एकाच वंशात झालेले ना? (वंश, कुळी, शेत, शरीर)–(२०८)

म्हणून नकोच हें झुंझ–युद्धाचें असें हें, मला तर याचा कांहींहि विश्वासच वाटत नाहीं–अहो, अशा ह्या महापापाचें–मोठ्या अधर्माचें, पातकाचें, दुष्कर्माचें, अपायाचें तें कामकाज कशास बरें पाहिजे तें?–(२०९)

अहो देवा! अनेक बाजूंनीं पाहिलें असता असेंच येथें दिसत आहे कीं–युद्ध येथें केलें असतां कल्याण का चांगलें होईल असें वाटत नाहीं; वर येथें कांहीं हें पापाचें कामकाज चुकविण्याचें केलें तरच बरें! असें लाभाचें तें जीवितच जोडल्यासारखें होणारें होईल.... (२१०)

**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**
**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥**

[न काङ्क्षे = इच्छित नाहीं, आशा धरीत नाहीं. विजयं = जय, अर्जुन. सुखानि च राज्यं च = आनंद देणारें सुख अथवा (राज्य–) राजाचा अधिकार किंवा कर्म. नः राज्येन किम् = आम्हांस ह्या देश-अधिकार कर्मांचा काय उपयोग? भोगैः किम् = खाणेंपिणें, सुखदुःख–अनुभव, द्रव्य, शरीर, इत्यादि काय कसचें तें? जीवितेन किम् = जीवन तरी काय?–]

**अन्वय :** कृष्ण, न काङ्क्षे विजयं । न राज्यं । च । सुखानि । च । गोविन्द । नः राज्येन किम् । भोगैः किम् । वा । जीवितेन किम् । च ।

**अर्थ :** हे कृष्णा–मी विजय इच्छित नाहीं, राज्य इच्छित नाहीं, आणि यावरच असलेलीं सुखेंही पण मी इच्छित नाहीं–हे गोविंदा, हें राज्य तरी मला काय, किंवा हा भोग–जीवन भोगानेंच जगावें–तरी मला काय, कसचा तो उपयोगाचा बरें ! (३२).

**तेथें विजयवृत्ति कांहीं । मज सर्वथा काज नाहीं ।**
**येथें राज्य तरी काई । हें पाहुनियां ॥ २११ ॥**

**या सकळांते वधावें । मग जे भोग भोगावे ।**
**ते जळतु अघवे । पार्थ म्हणे ॥ २१२ ॥**

विजयवृत्ति काज नाहीं = जयाची अपेक्षा गरज नाहीं. पाहुनिया–पावोनिया (२११). सकळांते वधावें मग जे भोग भोगावे = ह्या सकळांना टाकून, दुखवून जे भोग भोगणें तें नको–(२१२).

येथें मजला जयाची अपेक्षा, उपजीविका, गरज नाहीं. अहो, येथें राज्य जरी, तरी हें पाहून तें काय कामाचें तें ?–(२११)

ह्या सकळांना वधावें, पीडावें, दुखवावें, टाकून द्यावें व मग जें कांहीं भोग भोगण्याचें करणें तें नकोच मुळीं केव्हांही–असें पार्थ म्हणत आहे–(२१२)

**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥**

[अर्थे = उद्देशासाठीं, (दोषदोषासाठीं). काङ्क्षितं = इच्छिलेलें. भोगाः सुखानि = उपभोग सुखें. अवस्थिता युद्धे = रणांगणीं उभे आहेत. धनानि प्राणान् त्यक्त्वा च = प्राण, धन इत्यादि टाकून देऊन–सोडून.]

**अन्वय :** नः येषाम् अर्थे । च काङ्क्षितं राज्यं भोगाः सुखानि । ते इमे युद्धे अवस्थिता । च प्राणांस्त्यक्त्वा धनानि त्यक्त्वा ।

**अर्थ :** ज्यांच्याकरितां हे भोग, सुखें, राज्यें हीं आकांक्षावीं त्यांनींच मुळीं आपले प्राण व धन टाकून देऊन आमच्याशीं भांडण्यास उभें राहावें, हें आश्चर्य आहे ! (३३).

**तेणें सुखेविण होईल । ते भलतेही साहिजेल ।**
**वरी जीवितहि वेंचिजैल । ययालागि ॥ २१३ ॥**

**परी यासी घातु किजे । मग आपण राज्य भोगिजे ।**
**हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ २१४ ॥**

**तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें ।**
**जरी वडिल यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥ २१५ ॥**

**गोत्राते इप्सी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ ।**
**जें निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ २१६ ॥**

**हे मनीं केवि धरिजे । आपण वज्राचया होईजे ।**
**वरि घडे तरि कीजे । भले इयां ॥ २१७ ॥**

आम्हीं जें जें जोडावें। तें समस्तीं इहीं भोगावें।
हें जीवितही उपकारावे। याचि काजा॥ २१८॥
आम्हीं दिगंतीचे भूपाळ। विभांडुनि सकळ।
मग संतोषविजे कुळ। आपुलें जें॥ २१९॥
तेचि हे समस्त। परि कैसे कर्म विपरीत।
जे जाले असती उद्यत। झुंझावया॥ २२०॥
अंतौरिया कुमरें। सांडुनिया भांडारें।
शस्त्राग्रीं जिव्हारें। आरोपुनी॥ २२१॥
ऐसियांतें कैसेनि मारूं। कवणावरी शस्त्र धरूं।
निज हृदया करूं। घात केवीं॥ २२२॥

सुखेविण = भोगेविण. जीवितहि वेंचिजैल = जीवित खर्च करणें जें (२१३). घातु = वध (२१४). जियावें = जगावें. कां विरुद्ध मनें चिंतावें = प्रतिकूल मनानें विचार करावें (२१५). गोत्राते इप्सी कुळ = कुळ वंश इच्छितें. निर्दळिजे = संहारावे (२१६). मनीं केवि धरिजे = मनांत आणूंच नये. आपण वज्राचया होईजे = आपण वज्रापेक्षा कठीण व्हावें (२१७). जोडावें = मिळवावें. जीवितही उपकारावे = जीवन वेंचावें. याचि काजा = ह्याचसाठीं (२१८). दिगंतीचे भूपाळ = राजे दिगंतावरीलचे. विभांडुनि सकळ = जिंकून सकळ ते (२१९). कर्म कैसे विपरीत = उलट, विरुद्ध कर्म कैसें पाहा. उद्यत = प्रवृत्त, उद्युक्त (२२०). अंतौरिया कुमरें = (अंतुरी) स्त्रीपुत्र. भांडारें (सांडोनियां) = स्त्रीपुत्रधन मोह सोडून. शस्त्राग्री जिव्हारें आरोपुनी = तरवारीच्या धारेवर जीव ठेवून लढणारे (२२१). निज हृदया करूं घात केवीं = यांना मी कसा बरें मारूं?–(२२२)

ह्या भोगाशिवायच जें कांहीं होईल, तें तर–अहो, भलतेंही पण सहन केलें जाईल–याहीवर, याचसाठीं जीवित–जीवनही खर्च केलेलें बरें!–(२१३)

पण ह्यांचा घात करावा, ह्यांचा वध करावा व मग आपण राज्य तें भोगावें, असें माझ्या स्वप्नींही पण येत नाहीं–माझें मन असें करणें तें स्वप्नीं सुद्धां नच करील–(२१४)

असें जर का करणें तर मग आम्हीं जन्मावें तें कशास बरें?–कुणासाठीं जगावें?–जर का ह्या वडिलांना प्रतिकूल मनानें विचारांत घ्यावें तर.... (२१५)

गोत्र–वंश–कुळ इच्छिते–त्याचें काय हेंच फळ कीं जें का आपलें गोत्रच मुळीं संव्हारावें तें....(२१६)

असें मनींसुद्धां आणणें बरें नाहीं–आपण वज्राइतकें कठीण हृदयाचें होणें तें नको! वर त्यांचें भलें झालें–व्हावें–आपल्या हातून तेंच कीं केलेलें बरें!–(२१७)

आम्हीं जें जें जोडावें, साधावें, तें ह्या सकळांनीं–समस्तांनींही भोगावें; वर हें जीवित–जीवनही याच कामासाठीं उपकाराचें केलेलें बरें!–(२१८)

दिगंतीचे भूपाळ जे, ते आम्हीं जिंकून आपल्या कुळास संतोषवावें असें आहे–(२१९)

तेंच हे सर्व कुळ पण कसें, कसें विरुद्ध–विपरीत पाहा, जे का हेच मुळीं लढण्यासाठीं प्रवृत्त झाले आहेत–(२२०)

स्त्रिया, कुमार तसेंच आपलें भांडार तें टाकून देऊन, शस्त्राच्या धारेवरच जीव ठेवून लढणारे ते, मी.... (२२१)

अशांना कसा बरें मी मारण्याचें करूं? कुणावर तें शस्त्र धरूं?–निज हृदया घात तो का बरें करूं सांगा ना?–(२२२)

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबन्धिनस्तथा ॥ ३४ ॥**

[पितर = पितृ. पितामह = आजे. श्यालाः = मेहुणे. संबन्धिनः = आप्तसंबंधी.]

**अन्वय :** आचार्याः पितरः पुत्राः तथा च एव पितामहाः मातुलाः श्वशुराः पौत्राः संबन्धिनः श्यालाः तथा ।

**अर्थ :** गुरु, वडील, पुत्र, आजे, मामा, सासरे, नातू, मेहुणे, आणि तसेंच आप्त जे जे .... (३४).

**हे नेणसी तूं कवण । तरी पैल भीष्मद्रोण ।**
**जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥ २२३ ॥**

**येथें शालक सासुरे मातुल । आणि बंधू कीं हे सकळ ।**
**पुत्र नातू केवळ । इष्ट ही असती ॥ २२४ ॥**

**अवधारी अति जवळिकेचे । हे सकळही सोइरे आमुचे ।**
**म्हणौनि दोष आथी वाचे । बोलतांचि ॥ २२५ ॥**

तरी पैल = पलीकडचें. असाधारण = समाईक नव्हत-मध्यम नव्हत-सर्वांजवळ असलेले (२२३). शालक = मेहुणे, बायकोचा भाऊ. मातुल = मामा. इष्ट ही = सन्मानित, प्रिय (२२४). जवळिकेचे = जवळचे आप्त. सोइरे = सखे, सोबती, स्नेही. वाचे बोलतांचि दोष आथी = यासंबंधीं बोलणें करणें हेंही पण दोषच एक येणारा कीं-(२२५).

देवा, तुम्हीं हें जाणत नाहीं काय, जे का हे पलीकडचे भीष्म, द्रोण-ज्यांचे उपकार आम्हांवर झालेले-ते बहुत बहुत असे होत-ते काय अगदीं साधारणच मध्यमतेचे असे नव्हत बरें!-(२२३)

ह्या ठिकाणीं मेहुणे, सासरे, मामा आदि-तसेंच भाऊबंधु सकळ हे-तसेंच पुत्र, नातु, विशिष्ट इष्टमित्रही आलेले दिसत आहेत—असणारे दिसत आहेत-(२२४)

जाणून घे कीं, अतिशय जवळचे असे हे सकळ आमचे सोयरे-धायरे होत, आणि म्हणून याकरितांच मी येथें वाचेनें असें बोलणें जें कांहीं हेंही पण-दोषच कीं पदरांत येणारा-अगदीं जवळचे आप्त येथें मजशीं भांडण्यास आले आहेत असें बोलणें हेंही पण एक दोषच पदरांत टाकीत आहे-तें कसें तर .... (२२५)

**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

[घ्नतः अपि = मला मारूं लागले तरी. किं नु महीकृते = पृथ्वीवरील राज्याची काय कथा?]

**अन्वय :** मधुसूदन, त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि इच्छामि न हन्तुं एतान् घ्नतः अपि । किं नु महीकृते राज्यस्य हेतोः माम् ।

**अर्थ :** ह्यांना मी मारणार नाहीं, मारूं इच्छित नाहीं-मी मेलों तरी-मला ह्यांनी मारिलें तरी-हे मधुसूदना, त्रैलोक्याचें राज्यही मला नको आहे-मग ह्यातरी महीकृत-पृथ्वीवरील राज्याची काय कथा?-(३५).

**हें वरी भलतें करितु । आतांचियें आतांचि येथें मारितु ।**
**परि आपण मनीं घातु । न चिंतावा ॥ २२६ ॥**
**त्रैलोकींचें अनकळित । जऱ्हि राज्य होईल येथ ।**
**तरी हें अनुचित । नाचरे मी ॥ २२७ ॥**
**जरी आजि येथें ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे ।**
**सांगे मुख केवि पाहिजे । कृष्णा तुझें ॥ २२८ ॥**

वरी भलतें करितु = उलटपक्षीं हे भलतेंही करोत–पण. आपण मनीं घातु न चिंतावा = आपण मनामध्यें यांचा घात चिंतूं नयेच केव्हांही (२२६). अनकळित = निष्कंटक, क्लेशरहित, (पूर्वजीविताचें असें). अनुचित नाचरें मी = अयोग्य तें मी येथें आचरणार नाहीं (२२७). कवणाच्या मनीं उरिजे = पूजा, सत्कार होणारा जो तो कोण बरें मानील?; कुणाच्या मनामध्यें उरावें तें?; महत्त्व कोण बरें देईल?; कुणी मानलें व्हावें तें–कुणी मानावें मजला तें सांग कीं मग–. तुझें कृष्णा मुख केवि पाहिजे सांगे = तुझें हे श्रीकृष्णा, मुख कसें बरें तें पाहण्याचें होईल? (२२८).

हेंच मुळीं उलटपक्षीं भलतेंही करोत, आत्तांच्या आतांच येथें मारोत–पण आपण तर मनामध्यें कसलाहि यांना घात नच कीं चिंतावा तो–(२२६)

तिन्हीं लोकींचें निष्कंटक, क्लेशरहित असें, पूर्ण जीविताचें असें जरी राज्य झालें येथें–तरी अयोग्य असें हें कांहींहि मी आचरणार नाहीं–(२२७)

जर का आज येथें असें कांहीं तरी करावें, तर मग कुणाच्या तें मनीं उरावें आपण?–कोण बरें आपणास मानण्याचें करील?–येथें स्वतःचें जें कांहीं असणें, जगणें–सत्काराचें तें जीवित, महत्त्व मान्यतेचें असें, तें कुणीहि मग मानणार नाहीं–अहो हे श्रीकृष्णा, सांग कीं, सांगा कीं–मग तुझें, तुमचें मुख तें तरी कसचें दृष्टीस पडणारें होईल बरें?–(२२८)

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

[निहत्य धार्तराष्ट्रान् = ताडण, आघात, वध करणें जें, नाश करणें जें, ह्या धृतराष्ट्राच्या मुलांचा. नः का प्रीतिः स्यात् = आम्हाला काय तें–का कसचें तें सुख मिळणारें?–प्रीतिः = सुख, कृपा, आवड, उत्कंठा, संतोष (रस दोन तऱ्हांचा–प्रीति त्रास–आवड व कंटाळा–वृत्ति चंचल करणारा असा–अनित्य–स्वरूपापासून टळविणारा असा–२–११८.) अस्मान् पापमेव आश्रयेत् = आम्हांला उलट पापच लागेल; उलट पापच आमच्या आश्रयास येईल–आमचे आश्रयानें राहील. एतान् आततायिनः हत्वा = महापराधी, साहसी दुष्टांना–हत्यार उपसून मारण्यास आलेल्यांना, आगलाव्यांना–ह्या आततायींना मारण्यानें कीं—] .

**अन्वय :** हे जनार्दन—धार्तराष्ट्रान् निहाय नः का प्रीतिः स्यात् एतान् आततायिनः हत्वा अस्मान् पापम् एव आश्रयेत् ।

**अर्थ :** आम्हाला उलट पापच लागेल. अहो पापच कीं आमच्या आश्रयास (संबंध–सान्निध्य–स्थान) –येऊन असेल जर का ह्या आगलाव्यांना, महापराध्यांना, दुष्टांना–हत्यार उपसून मारण्यास आलेल्यांना–मारण्यानें कीं–हे जनार्दना! आम्हाला सुख (हर्ष, शर्म, सुख, संमदः।) तें काय कसचें तेथें त्यानें मिळणारें तें होईल?–(३६).

जरी वधू करूं गोत्रांचा । तरी वसौटा होईन दोषांचा ।
मज जोडलासि तूं हातींचा । दुरू होसी ॥ २२९ ॥

कुलहरणीं पातकें । तियें आंगी जडती अशेखें ।
ते व्हेळी तूं कवण के । देखावासी ॥ २३० ॥

जैसा उद्यानामाजि अनळु । संचरला देखौनि प्रबळु ।
मग क्षणभरि कोकिळु । स्थिर नव्हे ॥ २३१ ॥

सकर्दमु सरोवरु । अवलोकुनि चकोरु ।
न सेवित अव्हेरु । करूनि निघे ॥ २३२ ॥

तयापरि तूं देवा । मज झकवोनि ऐसिया मावा ।
जरि पुण्याचा ओलावा । नाशिजैल ॥ २३३ ॥

वधू–वधु–वध न करी–करूं. गोत्रांचा–गोत्रजांचा. वसौटा = वसतिस्थान, आश्रय. होईन–होऊनि. दुरू–दुर (२२९). कुलहरणी पातकें = कुलनाश करणारीं पातकें. अशेखें = सर्व. ते व्हेळी तूं कवण के–तये वेळीं तूं कवणें के. देखावासी = पाहावास, पाहिला होशील (२३०). अनलु–अनळ. देखौनि प्रबलु–देखोनि प्रबळ. कोकिलु–कोकिळ. नव्हे–नोहे (२३१) सकर्दमु–का सकर्दमु–सकर्दम सरोवर. अवलोकुनि चकोरु–अवलोकूनि चकोर. अव्हेरु–अव्हेर (२३२). तूं देवा झकवोनि ऐसिया मावा–तूं देवा झकऊन न येसी मावा. ओलावा–वोलावा–(देवा मला फसवून जाशील व माझ्यावरची तुझी माया–माव–ममता नाहींशी होईल) (२३३).

जरी मग गोत्राचा वध करूं, तर सर्व दोषांचें वसतिस्थान होईन, मला तुम्हीं जे जोडलेले, सांपडलेले आहात, ते दूर व्हाल–तुम्ही हातचे माझ्या–आतांचे जे, ते दूर जाल, व्हाल–(२२९)

कुळाचा नाश करण्यानें पातकें सर्व अंगीं जडतील–तेव्हां तूं देवा, कवणें बरें व तो कुठें देखावा, पाहाणें पाहावा असा ?–(२३०)

प्रबळ असा दावाग्नि (अनलु), संचरलेला उद्यानामध्यें, जर कोकिळानें पाहिला, तर तो कोकिळ तेथें क्षणभरसुद्धां स्थिर होणार नाहीं–मुळींच कीं तो तेथें थांबणार नाहीं–(२३१)

सरोवरामध्यें नुसता चिखलच–पाण्याचें नांवही नाहीं–तें पाहून चकोर तो तर तेथचें तें पाणी कसचें न काय नच सेवन करतांही, नच पीतांही, ते सर्वथा अव्हेरू करून, तेथून निघून जाईल कीं–(२३२)

त्याप्रमाणें देवा, तूं मला फसवून जाशील, व माझ्या ठायींची तुझी माया–ममता ती पार नाहींशी होईल कीं, तेथें मग तो पुण्याचा तो ओलावा नासेल, जिव्हाळा नासिजेल कीं–का–(२३३)

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

[आर्हाः वयं न = आम्हीं योग्य नव्हत, आम्हांला योग्य नव्हे. स्वबान्धवान् हन्तुं = आपल्या बांधवांना नाहींसें करण्याचें. स्याम सुखिनः = कसें बरें सुखी होऊं ते ?–]

**अन्वय :** माधव, तस्मात् धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् हन्तुं वयं न आर्हाः । कथं स्वजनं हि हत्वा वयं सुखिनः स्याम ।

**अर्थ :** ह्या स्वजनांना–कौरवांना नाहींसे करून आम्हीं सुखी व्हावें ही कल्पनाही योग्य नाहीं. स्वजनांचा नाश करून आम्हीं सुखी होण्याची इच्छा करणें बरें नाहीं–आम्हीं तेथें ते कसे सुखी राहूं ?–(३७).

म्हणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं ।
हें किडाळ बहुती परी । दिसत असे ॥ २३४ ॥

तुजसी अंतरावो होईल । मग सांग आमुचें काइ उरेल ।
तेणें दुःखें हिये फुटेल । तुजविण कृष्णा ॥ २३५ ॥

म्हणउनि कौरव हे वधिजेति । मग आम्ही भोग भोगिजेति ।
हे असो मात अघडती । अर्जुन म्हणें ॥ २३६ ॥

दिसत असे–दिसतसे (२३४). अंतरावो–अंतराय = विघ्न, अंतर, पडदा, (वियोग, अभाव). सांग काइ–सांगे काय. हिये = हृदय, धैर्य, मनःस्थैर्य, शांति (२३५). मात अघडती = न घडणारी मात, गोष्ट (२३६).

या कारणास्तव मी हें न करी; म्हणजे रणांगणामध्यें शस्त्र धरणार नाहीं–येथें तर अरिष्टच एक–वाईटच कांहीं एक–येथें दिसत आहे कीं–(२३४)

देवा श्रीकृष्णा, तुजशीं वियोग होईल, तुजमजमध्यें अंतर पडेल, भेटीमध्यें विघ्नच एक येईल, किंवा पडदाच एक–ज्या तूं देवा, दिसणार नाहींस–कारण काय, तर अभावात्मकच एक स्थिति वियोगामुळें कीं होणारी होईल ना व एक भावच अभावात्मक झाल्यानें दुःखामुळें माझें धैर्य हालेल, हृदयाची शांति नाहींशी होईल, तुमच्या दर्शनाशिवाय कीं. . . . (२३५)

आणि म्हणूनच कीं कौरव हे बधावेत–बधिजेत–व मगच आम्हीं भोग ते भोगावेत, अशी ही गोष्ट तर कालत्रयींहि नच घडणारी कीं, असें अर्जुन म्हणत आहे–(२३६)

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

[एते = कौरव. लोभोपहतचेतसः = लोभानें–हांव, मोह–भ्रांतचित्त झालेले. उपहत = ताडित, भ्रष्ट, निंदित, दिपून गेलेला.]

**अन्वय :** यदि अपि एते कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे पातकम् च लोभ उपहत चेतसः एते न पश्यन्ति ।

**अर्थ :** लोभानें भ्रांतचित्त झालेले हे कौरव जरी–कुलाचा क्षय केला असतां घडणारा दोष, तसेंच मित्रद्रोह केल्यानें होणारें पातकही पाहत नाहींत–तरीपण........ (३८).

हे अभिमानमदें भुलले । जन्हि पा संग्रामा आले ।
तन्हि आम्ही हित आपुलें । जाणावे लागे ॥ २३७ ॥

हें ऐसें कैसें करावें । जे आपुल्या आपण मारावें ।
जाणत जाणतां सेवावे । कालकूट ॥ २३८ ॥

हांजी मार्गी चालतां । पुढां सिंह जाला अवचिता ।
तरि तो चुके चुकवितां । लाभ आथी ॥ २३९ ॥

असतां प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा ।
तरी तेथें कवण देवा । लाभ सांगे ॥ २४० ॥

कां समोर अग्नि देखोनि । जरि न वचिजे वोसंडोनि ।
तरी क्षणा एका कवळुनि । जाळूं सके ॥ २४१ ॥

आम्ही–आम्हां. अभिमानमदें भुलले=ज्ञानगर्व मीपणानें भुललेले. संग्राम=युद्ध (२३७). आपुल्या–आपुले. जाणत जाणतां–जाणत जाणतांचि (२३८) मार्गी–मार्ग. जाला–जाहला. तरि तो चुके चुकवितां–तो तव चुकवितां (२३९). प्रकाशु–प्रकाश. तेथें–तेथ (२४०). न वचिजे वोसंडोनि=तो बाजूस टाकून जर नच जावें (वचणें = जाणें). वसंडणे = सांडून, बाजूस करून. कवळणें = आक्रमणें, आकळणें, सर्व बाजूंनीं वेढून (२४१).

हे ज्ञानगर्व मीपणानें भुललेले जरी का अहो ! ह्या येथें युद्ध करण्यास, संग्रामास आलेले आहेत, तरी आम्हीं आपलें हित–कल्याण तें–जाणावें लागत आहे ना !–(२३७)

ते नच करितां, आपलें हित–कल्याण कशांत आहे तें नच जाणतां, हें असें कर्म करावें कीं जें आपल्या आपण वधावें मारावें, जाणत जाणतां काळकूट तें सेवावें, जसें का–(२३८)

अहो, मार्गानें चालत असतां, कदाचित् अकस्मात पुढें सिंह आला–दिसला, झाला–तर तो चुकविल्यानें आयुष्यवृद्धीचा लाभच एक पदरीं पडणारा होईल ना !–(२३९)

आपलें जीवित जें आहे, तें तर असतां प्रकाशच एक ना, व तें आपलें असणें, जगणें, दिसता प्रकाश तो सोडावा, त्यजावा व मग कीं एक अंधारी विहिरच जशी का आश्रयाची करावी–त्या अंधाऱ्या विहिरीचें होणें जें, अज्ञानरूपी खळग्यामध्येंच पडणें जसें, तेथें कसचा बरें लाभ, अहो देवा, सांगा ना !–(२४०)

समोर अहो–आग लागली आहे तें पाहून, जर बाजूस होऊन आपण जर ती नच टाळली–तर अहो, एका क्षणामध्येंच कीं ती आग सर्व बाजूंनीं वेढून जाळूं शकणार नाहीं काय?–(२४१)

**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥**

[पाप = ब्रह्महत्या, अशुभ, अनिष्ट. निवर्तितुम् = निवृत्त होणें, टाळणें. ज्ञेयम् = जाणण्यास योग्य. दोष = अधर्म, संकट, पाप, चूक. प्रपश्यद्भिः = स्पष्ट पाहणारे, जाणणारे–त्या आम्हांला.]

**अन्वय :** जनार्दन, कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः अस्मात् पापात् निवर्तितुम् कथं न ज्ञेयम् ।

**अर्थ :** तरी हा कुलक्षयकृत दोष आम्हांस स्पष्ट दिसत असूनसुद्धां, तो निवारण करण्याचे उपाय आम्हीं योजूं नये, समजूं नये म्हणजे काय?–(३९).

**तैसे दोष मूर्त । अंगी वाजो असे पाहात ।**
**हें जाणताहि केविं येथ । प्रवर्तावें ॥ २४२ ॥**
**ऐसें पार्थ तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं ।**
**या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ २४३ ॥**

मूर्त–हे मूर्त=मूर्तिमंत, घट्ट, कठीण. अंगी वाजो असे–असती–पाहात. प्रवर्तावें=कार्यांत दृढ–निमग्न व्हावें, वर्तन करावें (२४२). अवसरीं = वेळेस. कल्मषाची थोरी = पापाची (कल्मष = पाप, गलिच्छपणा, घाण, डाग) (२४३).

कठीण असे मूर्तिमंत दोष, चूक, अधर्म अंगीं वाजू–लागो–पाहत आहेत–दोष अंगीं येऊं पाहत आहे, असें जाणूनही कसें तें, का बरें येथें, तसलें तें वर्तन करावें बरें–अहो ! (२४२)

असें त्यावेळेस पार्थ तो देवास म्हणत आहे कीं–देवा, लक्षांत घ्या–ऐकून घ्या–अहो, ह्या गलिच्छपणाची, ह्या डागाची, ह्या पापाची, ह्या घाणीची ती मोठेपणाची श्रेष्ठता–अतिशयतेचें पुष्कळपण मोठें असें आहे–(२४३)

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नम् अधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

[कुल = घराणें, घर, समुदाय, व्यापारी, वाणी, बायकोची थोरली बहीण, शेवाळ, चांगलें कुल. क्षय = कमी होणें, नाश, प्रळय, क्षयरोग, घर, स्थान, वासस्थान. प्रणश्यन्ति = अदृश्य होतात, नाश पावतात, पळून जातात. धर्मः = पुण्यकर्म, चाल, संप्रदाय, आचार, कायदा, स्वभाव, नीति. सनातनाः = शाश्वत, नेहमींचा, चिरकाल टिकणारा, निश्चल, अढळ. नष्टे = बिघडलेला, नाहींसा झालेला. (नष्टात्मा = मूर्ख). कृत्स्नम् = १) सर्व. २) पाणी. अधर्म = शास्त्रविरुद्ध आचरण; अधर्माची देवता निर्गुण ब्रह्म. अभिभवति = जेरीस आणणें, अपमान, पीडा. उत् = उलटपक्षीं देखिल खरेंच.]

**अन्वय :** सनातनाः कुलधर्माः कुलक्षये प्रणश्यन्ति धर्मे नष्टे कुलं कृत्स्नम् अधर्म अभिभवति उत् ।

**अर्थ :** सनातन कुलाचार कुलक्षय झाल्यानें नाहींसे होतात. कुलाचारांचा नाश झाल्यावर अधर्माचें वर्चस्व होतें (४०).

**जैसें काष्टें काष्ठ मथिजे । तेथें वन्हि येक उपजे ।**
**तेणें काष्टजात जळिजे । प्रज्वळलेनि ॥ २४४ ॥**

**तैसे गोत्रीचि परस्परे । जरि वधु घडे मत्सरे ।**
**तरी तेणें महादोष घोरें । कुळचि नाशिजैल ॥ २४५ ॥**

**म्हणौनि येणें पापे । वंशजु धर्म लोपे ।**
**मग अधर्मचि आरोपे । कुळामाजी ॥ २४६ ॥**

मथिजे = घासावे. येक–एक (२४४). तैसे–तैसा. वधु = वध, ठार मारणें, कापणें, पूर्ण करणें, [वध = प्रमाणम्, निर्वहणम्, निर्ग्रथनम्, परिवर्जनम्, उद्वासनम्, निकारणम्, विशारणम्, अपासनम्, निरोपणम्, प्रमथनम्, प्रत्रासनम्, परासनम्, निस्तर्हणम्, मारणम्, विशसनम्, कथनम्, निषूदनम्, निर्हिंमनम्, निहननम्, उज्जसनम्, विर्घसनम्, संज्ञपनम्, क्षणनम्, प्रतिघातनम्, आलम्भः, पिञ्जः, विशरः, घातः, उन्माथः, वधः इति ३० वधस्य। वधु = वनस्पति. वधू = सीमंतिनी वधूः प्रतिपददर्शिनी । स्नुषा जनी वधू = पुत्रभार्या वधुर्जाया स्नुषा स्त्रीच–जाया–भार्या । स्नुषा, पुत्रस्य पत्नि, तत्र स्त्रीमात्रेच वधूः ।] महादोष–महादोषे. नाशिजैल–नाश (२४५). म्हणौनि–म्हणउनि. येणे–एणे. वंशजु धर्म–काजधर्म = कुळधर्म. आरोपे = रूढ होतो, वाढतो, उगवतो (२४६).

लाकडावर लाकूड घासावें, तेव्हां तेथें एक वन्हीच कीं निपजतो, उपजतो, त्या वन्हीनें सर्वच्या सर्व काष्ठजात म्हणून आहे तें, तो वन्हि प्रज्वळला झाल्यानें–भडकल्यानें–जाळून घालतो, जाळून टाकतो–(२४४)

त्याप्रमाणें परस्पर एकमेक, बाहेरच्या बाहेरच जर का कांहीं लोभानें–दुष्टपणेंकरून–हेवा धरल्यामुळें, गर्वानें, क्रोधामुळें मत्सराचें होणें होऊन वध घडला; तरी मग त्या घोर अशा महादोषानेंच मुळीं कुळचि नासिजेल ना! (मत्सरिन् = हेवा करणारा)–(२४५)

या कारणास्तव, ह्या पापामुळेंच वंशजु धर्म–कुळधर्म–लोप पावतो, हिरावून घेतला जातो, प्रचारांतून जातो, अभावात्मक होतो–नाशतो, व मग सर्व अधर्मच–शास्त्रविरुद्ध आचरणच–एक कुळामध्यें आरोपिला होतो, रूढ होतो, प्रसवतो, वाढतो–(२४६)

**अधर्माभिभवात् कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

[दुष् = चूक करणें, भ्रष्ट होणें, बिघडणें, निंदणें, भंग करणें, नष्ट करणें (+प्र). दुष्टासु = नष्ट, बहिष्कृत, अधम, अपराधी, सदोष–असु–पाणी, पंचप्राण इंद्रियें, मन, विचार, दुःख, श्वासोच्छ्वास, उष्णता. (अस् = वाहन).]

**अन्वय :** कृष्ण । कुलस्त्रियः अधर्म अभिभवात् प्रदुष्यन्ति । वार्ष्णेय । वर्णसंकरः जायते दुष्टासु स्त्रीषु ।

**अर्थ :** हे कृष्णा, अधर्म प्रबळ झाला म्हणजे कुलस्त्रिया दुराचारी बनतात आणि स्त्रिया बिघडल्या म्हणजे वर्णसंकर होतो (४१).

**तेथें सारासार न विचारावें । कवणें काय आचरावें ।**
**विधिनिषेध आघवे । पारुषति ॥ २४७ ॥**

**असता दीप दवडिजे । मग अंधारी राहाटिजे ।**
**तरी उजूचि आडळिजे । जयापरी ॥ २४८ ॥**

**तैसा कुळीं कुळक्षय होय । तये वेळीं तो आद्य धर्मु जाय ।**
**मग आन कांहीं आहे । पापावांचुनि ॥ २४९ ॥**

**जै यमनियम ठाकती । तेथें इंद्रियें सैरा विचरती ।**
**म्हणौनि व्यभिचार घडती । कुलस्त्रियां ॥ २५० ॥**

**उत्तम अधमी (अधर्मि) संचरति । ऐसे वर्णावर्ण मिसळति ।**
**तेथें समूळ उपडति । जातिधर्म ॥ २५१ ॥**

**जैसीं चोहाटाचिये बळी । पावती सैरा काउळीं ।**
**तैसी महापापें कुळीं । प्रवेशति ॥ २५२ ॥**

तेथें–एथ. न विचारावें–विचारावें. आचरावें–आचारावें. विधिनिषेध पारुषति = कठोर होतात. (१) रागावतात, (२) बंद होतात, (३) राहतात (२४७). दवडिजे = घालवावा. असता दीप–राहाटिजे = हातचा दिवा घालवावा आणि मग अंधारांत व्यवहार करावा. उजू = सरळ (मार्गामध्येंही) आडळिजे–आडखुळिजे = अडखळावें, चाचपावें–पडावें जसें (२४८). आद्य धर्मु–अनादि कुळधर्म. आन कांहीं आहे = दुसरें कांहींहि नाहीं (२४९). यमनियम ठाकती = यम (अंतरींद्रिय मनाचें आकलन) नियम (बाह्येंद्रियांचें आकलन). सैरा = स्वेच्छ. ठाकती = थांबतात. व्यभिचार = दुराचार, हेतु असून साध्य नसणें, अपवाद (२५०). उत्तम अधमी संचरति = उत्तम अधमाचे ठायीं समागम करितात. वर्णावर्ण = ब्राह्मणादि चारी वर्ण. उपडति = लय पावतात (२५१). चोहाटाचिये बळी पावती सैरा काउळीं = चव्हाट्यावर ठेविलेल्या बळीवर कावळे जसे झडप घालतात–[भैरवम्, दारुणम्, भीषणम्, भीष्मम्, घोरं, भीमं, भयानकम्, भयंकर, प्रतिभयं, रौद्र = महत्–महा = भयंकर, भयानक. पाप–नृशंसः, घातुकाः, क्रूरः, पाप इति ४ परद्रोहशीले । दरिद्र–निःस्वः, दुर्विधः, दीनः, दरिद्रः, दुर्गत इति ५ दरिद्रस्य । खल–पिशुनः, दुर्जनः, खल इति ३ परस्पर भेदनशीलाः । मूढ = अज्ञः, मूढः, यथाजातः, मूर्खः, वैधेयः, बालिशः इति ६ मूर्खस्य ।]–(२५२)

तेव्हां सार, आत्मभाव काय-असार, अनात्म, अभाव काय, हें विचारास घेणें का विचारणें, पुसणें तें बंद होतें-कुणी काय आचरावें व तें कसें, हें राहतें; व विधीचें-विश्वाकाराचें होणें, योग्य, अनुष्ठान का निषेधाचें जें, अयोग्य, अभावात्मक होणें जें, तया आणू आकारा, निराकार न होऊं देऊं-तेंही रागावतें, बंद होतें, राहतें-बंद होतात-(२४७)

हातचा दिवा घालवावा आणि मग अंधारांत व्यवहार करावा, तेथें जसें का सरळमार्गामध्येंही कीं अडखळणेंच, चांचपडणें, पडणेंच व्हावें जसें-(२४८)

त्याप्रमाणें घराण्यामध्यें-कुळामध्यें कुळक्षय, कुळसमुदायक्षय होत आहे-तेव्हां तो अनादि आद्य धर्म, कुळधर्म-घराणें धर्म, नाहींसा होतो. तेथें मग पापावांचुनि दुसरें तिसरें कांहींच (सापडणारें नव्हें) नाहीं-(२४९)

जर का-जेव्हां का अंतरींद्रिय मनाचें आकलन (यम), बाह्येंद्रिय आकलन (नियम) थांबतात, तेव्हां इंद्रियें अगदीं स्वेच्छ-स्वेच्छाचारानें वागूं लागतात-राहाटतात; आणि म्हणूनच कीं घराण्याच्या कुळस्त्रियांमध्यें दुराचार-हेतु असून साध्य नसणें-अपवाद असे व्यभिचार घडूं लागतात-(२५०)

उत्तम ते अधमाचे ठायीं समागम करतात-असे ब्राह्मणादि चारी वर्ण मिसळतात-तेथें समूळपणेंच कीं जाती धर्म ते लय पावतात. [जाति-सामान्यं गोत्वादि जन्मानि च जातिः। सुमना, मालती, जाति इति ३ जातेः। जातिः, जातम्, सामान्यम् इति ३ घटत्वादि जातेः। व्यक्तिः, पृथगात्मताः इति २ घटादिव्यक्तेः॥] (२५१).

"चोहाटाचिये बळी (चव्हाठ्यावर ठेविलेला बळी) पावती सैरा काउळीं"-चार रस्त्यावर, चव्हाठ्यावर ठेविलेल्या बळीवर कावळे जसे चहुंकडून झडप घालतात-पोहोंचतात, पावतात, त्याप्रमाणें का तशींच कीं-अहो, महापापें [पाप = अशुभ, नीच, दुष्ट, दुर्दैव, दोष, पाप (महत् = महा) भयंकर, भयानक] कुळामध्यें प्रवेश करूं लागतात, प्रवेश करतात-(२५२)

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च।**
**पतन्ति पितरो ह्येषाम् लुप्तपिण्डोदकक्रियाः॥ ४२॥**

[संकरः = १) संयोग, मिश्रण. २) जातिमिश्रण. ३) अग्नीचा फुरफुराट, चटचट शब्द. संकरी = नवदूषित कन्या. संकरीकरण = पातक. नरकाय एव = नरकाकरितांच फक्त. (नरक आमय = पिशाच्च. नरकदेवता = अक्काबाई, मूर्तिमंत दुर्दैव. नर्कुटकं = नाक). पिण्ड = गोळा, अन्न, श्राद्धातील पिंड, अन्नाचा घांस, उदरपूरण, लोणी, जीवन. पिंडयज्ञ = श्राद्धांत पितरांस पिंड देणें. पिंडपातः = भिक्षा घालणें. पिंडपुष्प = अशोक, जाखंड, कमलिनी. पिंडबंध = शरीरसंबंध. पिण्डबीज = कण्हेर. पिंडलोप = वंश खुंटणें. पिंडभाज = पितर. पिंड = लोह, कुंभ, गंधरस, बोल, प्राणी, गौण रस, अरघट्ट, हट्ट. उदक = (१) पाणी (उद = पाणी. उदक् = उत्तरेकडे, नंतर, वारे). (२) और्ध्वदेहिक कृत्य. "उद" समासांत उदकबद्दल-उदधि = समुद्र, ढग, तळें, डोह, जलकुंभ. उदजं = कमळ. उदक्रम = दर्यावर्दी. उदमेखला = पृथ्वी. उदप = होडी. उदपान = जलाशय (विहीर, इत्यादि). उदप्लवः = जलप्रलय. उदमंथ = सातू, तूप व पाणी यांचें मिश्रण. उदवज्र = उदकास्त्र. उदवापः = पितृतर्पण करणारा. उदश्वित् = दह्याचे बरोबर पाणी घालून केलेलें ताक. उद् = ऊर्ध्वगति (उत्कंधर) (उत्पताक) (उदायुध) उत्कंचुक (वियोग अभाव). उद्बल = श्रेष्ठत्व.

क्रिया = (कर्म) करणें, प्रायश्चित्त, अभ्यास, समाप्ति, श्रम, शिक्षण, विद्या, विचार, ग्रंथकृति, पूजा इत्यादि धर्मकृत्य, मृताची क्रिया, अध्यात्म, उपचार-क्रिया + आरंभ = स्वयंपाक. क्रियाकार = नवीन विद्यार्थी. क्रियायज्ञ = गर्भाधानादि संस्कार. क्रियायोग = योगाचीं साधनें (तपश्चर्या, अध्ययन व ईश्वरसाधन).

क्रियावत् = उद्योगतत्पर. पतन्ति = पत् = पडणें. पत् = पाय, चरण. पतंग = (१) शीघ्रगामी. (२) पक्षी. पितर = पितृ = (१) बाप. (२) पितर. (३) पितृलोकवासी सोमप. (४) वडील नातलग (चुलता). पितृलोक = चंद्रलोक. पितृयज्ञ = श्राद्धतर्पण. पितृक्षय = मृत्युतिथि. पितृव्य = चुलता. पितृष्वसृ = आत. पितृतर्पण = (१) पितरांना दान. (२) पूर्वजांना पाणी देणें. (३) अंगुष्ठ व तर्जनी यांमधला भाग, तीळ. पितृकर्मन् = श्राद्ध, तर्पण. पितृदान = पितृकार्य, श्राद्ध. पितृपवित्र = तीळ. पितृत्रय = बाप, आजा व पणजा. पितृदैवत = मघा (ज्यो०). पितृपैतामह = पिता–वडिलोपार्जित, वाडवडिलांपासून चालत आलेला. पितृप्रिय = माका, अगस्ता, केळीचा गाभा. पितृयज्ञ = अंत्येष्टि, और्ध्वदेहिक, पितरांचें श्राद्ध, तर्पण, इत्यादि. पितृवन, स्थान = यमलोक. पितृहूः = उजवा कान. पितृस्वस्रीम = आतेभाऊ.

लुप्त = लुप् = (१) नाहींसा झालेला. (२) गाळलेलें (अक्षर इत्यादि). (३) टाळलेलें. (४) चोरीचा माल. कुल = घराणें, घर, देश, शरीर, समुदाय, कळप, काळा सुरमा, बारा बैल नांगरतील एवढें शेत, व्यापारी, वाणी, पत्नीची ज्येष्ठ बहीण. (कुल + अकुल = मिश्र कुळाचा. कुलक = चार श्लोकांचा एक वाक्यसमूह. कुलमर्यादा = कुलीनपणा. कुलीन = उत्तम कुळांतला. कुलाय = घरटें, शरीर, देह. कुलिश = इंद्राचें वज्र, कुन्हाड. कुलतिथिः = शुद्धपक्षांतील २। ६। १० व कृष्णपक्षांतील ४। ८। १२। १४ ह्या तिथि. कुलवार = मंगळवार, बुधवार, शुक्रवार. कुल + अंकुर = ग्रामदेवता. कुल + अचल = सात मुख्य पर्वत— १) महेंद्र. २) मलय. ३) सह्य ४) शुक्तिमान्. ५) ऋक्ष. ६) विंध्य. ७) पारियात्र. कुल + आधारकः = मुलगा. कुल + उपदेश = आडनांव. कुलकर = कुलदीपक, कुलसंस्थापक. कुलचारिन = खासगीमधील कामगार. कुलनाशः = बहिष्कृत, उंट, निर्वंश. कुलपति = दहा हजार शिष्यांना अन्न देऊन शिकविणारा ऋषि. कुलपुरुष = पूर्वज, कुलीन मनुष्य. कुलकंटक = कुलपीडक. कुलसौरभ = मरवा. कुलसंख्या = कुलीनांत गणना. कुलस्थितिः = कुळाचें प्राचीनत्व, कुळाचार. कुलकः = झांज, ताल वाजविणें.]

**अन्वय :** एव नरकाय संकरः। पितरः (कुलघ्नानाम्) एषां हि लुप्तपिंड उदक क्रिया (पितरः) पतन्ति कुलस्य संकरः। च कुलघ्नानाम् संकरः।

**अर्थ :** वर्णसंकर झाला म्हणजे कुलघात होतो व सर्व कुलेंहि तीं नरकास जातात; आणि पिंडदानादि क्रिया नष्ट–लुप्त–झाल्यामुळें स्वर्गस्थ पितरहि पतन पावतात–पतन पावलेल्या कुळापाशीं येतात (४२).

**मग कुळी तया अशेखा। आणि कुळघातकां।**
**येर येरां नरका। जाणे आथि ॥ २५३ ॥**
**देखै वौंशवृद्धि समस्त। यापरि होय पतित।**
**मग वोवांडति स्वर्गस्थ। पूर्वपुरुष ॥ २५४ ॥**
**जे नित्यादि क्रिया ठाके। आणि नैमित्यक कर्म पारुषे।**
**तेथें कवणा तिळोदकें। कवण अर्पि ॥ २५५ ॥**
**तरी पितर काइ करिति। कैसेनि स्वर्गि वसति।**
**म्हणौनि तेहि येति। कुळापासीं ॥ २५६ ॥**
**जैसा नखाग्रीं व्याळु लागे। तो शिखांत व्यापी वेगें।**
**ते अव्रह्म आवघे। अल्पविजे ॥ २५७ ॥**

**अशेखा** = सर्व. जाणे आथि = जाणे पडते (२५३). वौंश–वंश. वोवांडति–वोवांडिली = खालीं कोसळतात, खालीं पडतात. (स्वर्गस्थ) पूर्वपुरुष = प्राचीन, पूर्वींचे, पूर्वज (प्राचीन वाडवडील), वडील, लहानपणचे. पूर्व–अपर = साधकबाधक विचार. पूर्व–अर्ध = (शरीराचा) वरचा भाग. पूर्वकर्म = प्राक्तन.

पूर्वगंगा = नर्मदा. पूर्वतः = प्रथमतः, पूर्वेस, समोर. पूर्वतर = प्राचीन काळापासून चालत आलेलें. पूर्वदेव = (१) नर, ऋषी, अर्जुन. (२) वृषपर्वा (दैत्य). (३) असुर. (वृषपर्वा = ययातीच्या वेळच्या असुरांचा अधिपति–शर्मिष्ठेचा पिता–शुक्राचार्यांच्या मदतीनें यानें देवांशीं युद्ध केलें). पूर्वपर्वत = उदयाचल. पूर्वपितामह = पूर्वज, पणजोबा. पूर्वपुरुष = (१) ब्रह्मा. (२) बाप, आजोबा, पणजोबा. पूर्वभाषिन् = घरीं आलेल्यांशीं सत्कारपूर्वक प्रथम भाषण करणारा. पूर्वमीमांसा = कर्मकांडाचें शास्त्र. पूर्ववयस् = तारुण्य. पूर्वविद् = इतिहासज्ञ ऋषी. पूर्वसंध्या = पहाट. पूर्ववत् = परिणामाचें अनुमान. ढगावरून पावसाचें अनुमान सदरहूप्रमाणें (२५४).

जे–जेथ. नित्यादि क्रिया ठाके = स्नानसंध्यादि पंचमहायज्ञ जेथें बंद पडतात. आणि नैमित्यक कर्म पारुषे–आणि नैमित्तिक क्रिया पारुखे = श्राद्धपक्षादि क्रियाकर्में जेथें होत नाहींत–किंवा महापर्वास करावयाचीं कर्में होत नाहींत. तिल अप–तिळोदकें = पितृतर्पणाचे तिल–सूक्ष्मांश–मिश्रित जल [(तिल = (१) तीळ, (२) सूक्ष्मांश, सूक्ष्म शरीर, लिंगदेह). (सूक्ष्म = बारीक, लहान, नाजूक, सुरेख, धूर्त, बिनचूक, परमाणु, निवळीचें बीं, परब्रह्म, अध्यात्म, कपट, युक्ति)]. सूक्ष्मदर्शिन् = अतिबुद्धिमान्. सूक्ष्मतंडुल = खसखस. कवण कवणा तिळोदकें अर्पि = कुणास तें तिळोदक कुणीं तें अर्पावें असें कसचें तें–(२५५). स्वर्गि कैसेनि वसति म्हणौनि तेहि येति कुळापासीं = मग पितर काय करितात तर स्वर्गीं नच राहण्यास मिळाल्यानें कुळापाशीं, कुळाजवळ, येऊं लागतात–(२५६). नखाग्रीं व्यालु लागे = नखाच्या अग्रीं सर्प लागला तो तर–तो शिखांत व्यापी वेगें = शेंडीपर्यंतही व्यापतो. ते (तै) अब्रह्म आवघे अल्पविजे–आल्पविजे = तेव्हां अब्रह्मींच कीं सर्व कुळ बुडून जातें–क्षुल्लक केलें जातें [अल्प = तरुण] (२५७).

मग त्या अशेख सर्व कुळास, तसेंच त्या कुळघातक्यांना–परस्पर एकमेकीं नरकासच जाणें, असेंच तें योग्यतेचें म्हटलें होतें–तेथें आथि, योग्य, उपयुक्त, उचित, साजेसें, चतुर, अनुरूप हें म्हटलें होतें–(योग्य = पुरणपोळी इत्यादि पक्वान्न; योग्यता, लायकी, हुशारी, पवित्रता). (२५३)

जाणा कीं, याप्रमाणें समस्तही वंशवृद्धि पतित होते, तेव्हां मग स्वर्गीं असणारे–स्वर्गी राहणारे–पूर्वपुरुष ते पडतात, पाडले जातात, किंवा तेच मुळी पाडतात–का उलटतात–(२५४)

नित्य क्रिया जी तीच मुळीं बंद पडते, तसें नैमित्तिक तें कर्म तेंही नष्ट होतें–माघार घेतें, तेव्हां मग पितृतर्पणाचीं तीं तिळोदकें कुणास कुणीं द्यावयाचीं–हें कसचें तें होणारें बरें!–(२५५)

पितरांनीं आतां काय करावें, असा तेथें प्रसंग–पेंच पडल्यानें, तेच मुळीं स्वर्गीं तर मुळींच नच राहणें होण्यानें–स्वर्गातून ढकलले गेल्यानें–ते मग कुळामध्येंच येऊन असतात–पतितपण कुळाचें, त्याचेंच कीं त्याग–मग होणें व्हावें लागतें–(२५६)

जसा नखाच्या अग्रभागीं सर्प लागला–तो तर, तेथचें विष तें तर त्वरिततेनेंच कीं नखशिखांत व्यापणारें झाल्यानें, तेथें अब्रह्मच अवघें अल्पविलें होतें–तें कुळ अब्रह्मींच बुडून जातें. क्षुल्लकतेचें केलें होतें–(२५७)

**दोषैरेतैः कुलघ्नानाम् वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**
**उत्सन्नकुलधर्माणाम् मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम् ॥ ४४ ॥**

[कारकैः = करणारे. उत्साद्यन्ते = नाश पावतात; विध्वंस करणें, त्याग करणें. जातिधर्माः = गोत्रज बांधव धर्म (४३). अनुशुश्रुम् = परंपरेनें ऐकिलें आहे. नियतम् = नेहमीं, सदोदित. उत्सन्न = नाश पावलेला (४४).]

**अन्वय :** कुलघ्नानां एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः शाश्वताः कुलधर्माः च उत्साद्यन्ते । (४३).

जनार्दन। अनुशुश्रुम् । मनुष्याणाम् उत्सन्नकुलधर्माणाम् नरके नियतं वासः भवति इति । (४४).

**अर्थ :** कुलघातक्यांच्या ह्या वर्णसंकरादि पापामुळें, शाश्वत ज्ञातिधर्म आणि कुलधर्म नष्ट होतात-(४३).

हे जनार्दना! मनुष्याचे कुलधर्म नष्ट झाले, त्यांना निश्चयेंकरून नेहमीं, सदोदित नरकवास प्राप्त होतो, असें आम्हीं ऐकत आलों आहोंत-(४४).

**देवा अवधारी आणीक एक । येथें घडे महापातक ।**
**जे संगदोषें लौकिक । भ्रंश पावे ॥ २५८ ॥**

**जैसा परि आपुला । वानिवसें वन्हि लागला ।**
**तो आणिकही प्रज्वळिला । जाळूनि घाली ॥ २५९ ॥**

**तैसिया तया कुळसंगति । जे जे लोक वर्तती ।**
**तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ २६० ॥**

**तैसे नाना दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ ।**
**मग महाघोर केवळ । निरय भोगी ॥ २६१ ॥**

**पडिलिया तिये ठाईं । मग कल्पांतीही उगंडु नाही ।**
**येसणें पतन कुळक्षईं । अर्जुन म्हणे ॥ २६२ ॥**

संगदोषें = सोबत, सांधा, भेट, संवय, स्पर्श. लौकिक भ्रंश पावे = सामान्य प्रापंचिक लोकांत रूढ असलेला (२५८). वानिवसें = स्वेच्छेनें, सहज, माजघराला. वन्हि-अग्नि. प्रज्वळिला = धगधगीत झाला, प्रदीप्त झाला (२५९). बाधा पावती = (तस्करबाधा) चोरबाधा, चोरी, कपट, मरण, वध. उत्तम दर्जा सोडून हलक्या कोटीचा आश्रय करणें जें त्याचें नांव बाधा (२६०). नाना दोषें सकळ = अनेक तऱ्हेच्या सर्व दोषांमुळें. महाघोर केवळ निरय भोगी = नरक भोगणारे महत् घोर (२६१). कल्पांतीही उगंडु-उकल-नाहीं = सुटका नाहीं, कल्पांतींसुद्धां मग. येसणें पतन = एवढें पुरुषत्वपतन (२६२).

देवा, आणीक एक गोष्ट तुम्हांस सांगतों कीं-येथें एक महापातक घडणारें, लागणारें होतें, जें का सोबती-संगामुळें, स्पर्शामुळें, भेटीमुळें, सदाचार-लोकआचार तो-भ्रंश पावतो-पतन, ऱ्हास, बुद्धीच्या चळाचा होतो-(२५८)

ज्याप्रमाणें आपल्या घरीं माजघरामध्यें, सहज स्वेच्छेनेंच वन्हि-अग्नि लागला-माजघर पेटलें-तो तर प्रज्वळला होऊन आणीकही कांहींएक जाळून घालतो-(वन्हि = अग्नि, ढीग, याचना, इच्छा, उद्भिज कोटि) -(२५९)

तसल्या त्या कुळाच्या संगामुळें-सोबतीनें-जे जे लोक वागतात, वर्ततात, तेसुद्धां ह्या निमित्तानें-ह्या कारणामुळें-कीं बाधा पावतात-(चोरी, कपट, भोंक पडणें, वध, बाधा पावणें जें-ऐकणें जें)-(२६०)

तसें अनेकच्या अनेक सर्व दोषांमुळें, अर्जुन म्हणत आहे कीं-तें कुळ, महाघोर केवळ नरक भोगणारें होतें-होय (२६१)

त्या ठायीं-त्या नरकामध्यें पडल्यास-मग कल्पांतींही त्याला सुटका नाहीं-एवढें पुरुषत्वपतन कुळक्षयामुळें होणारें-होत असतें-(२६२)

**अहो बत महत्पापम् कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥**

[ अहो = आश्चर्य, शंका, निंदा, इत्यादि. बत = अबबब !–अहो, एक येथें केवढें पाप–आश्चर्य, खेद, संतोष ( इत्यादि अर्थीं ). व्यवसिता = निश्चित, उद्यक्त झालों. उद्यताः = प्रवृत्त, उद्युक्त. ]

**अन्वय :** बत। वयम् महत्पापम् कर्तुम् व्यवसिता–अहो ! यत्। स्वजनं हन्तुं उद्यताः। राज्यसुखलोमेन। वयम्।

**अर्थ :** अरेरे ! केवळ राज्यसुखाच्या लोभानें आम्हीं स्वजनांचा नाश करण्यास उठलो–हें आम्हीं एक महापापच करण्याचें योजिलें आहे (४५).

**देवा विविध कानीं ऐकिजे । परि अझुनुवरि त्रासु नुपजे ।**
**हृदय वज्राचे हे काइ कीजे । अवधारी पां ॥ २६३ ॥**

**अपेक्षिजे राज्यसुख । जया लागीं तें तव क्षणिक ।**
**ऐसें जाणतां देख । अव्हेरूं ना ॥ २६४ ॥**

**जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दृष्टी सूदले ।**
**सांग पां काइ थेकुलें । घडले आम्हां ॥ २६५ ॥**

विविध–हे विविध. अझुनुवरि–अझुनिवरि. त्रासु–त्रास. काइ–काय (२६३). हे–ते. जाणतां–जाणताहि. दोख अव्हेरूं ना = आम्ही अझुनीही दोष टाकीत नाहीं (२६४). दृष्टी सूदले = दृष्टीपुढें, दृष्टीला घातले. थेकुलें = हें काय थोडें पाप म्हणावें? हें पाप काय कमी म्हणावें?–(२६५)

नाना प्रकारचें तें ऐकणें कानीं ऐकावें, पण अद्यापिहि त्रास उपजत नाहीं–काय करावें ! अहो, हृदय हें तर वज्राचें असें कठीण करणें होत आहे हें जाणतांना–(२६३)

राज्यसुख, राजाचा अधिकार किंवा राजाचें कर्म, इच्छेवजें, जरूरीचें तें करिजे ( जें सुख तर क्षणिक असेंच ) ज्याकरितां हें तर अहो क्षणिक असेंच कीं आहे–वर असें जाणूनही दोष लागणारा तो, अव्हेराचा कां न बरें करावा तो ?–(२६४)

हे जे सर्व आपल्यापेक्षां वडील आहेत, हे तर वध करण्यासाठीं दृष्टीपुढें घातले जात आहेत–तर येथें सांगा देवा कीं, हें काय थोडें पाप होत आहे म्हणावें ! होणारें येथें जें हें पाप काय कमी म्हणावें ?–(२६५)

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥**

[ अप्रतीकारम् = प्रतिकार न करणाऱ्याला. शस्त्रपाणयः = हातीं शस्त्र असलेले. तन्मे क्षेमतरं भवेत् = तें मला अधिक कल्याणकारक होईल. ]

**अन्वय :** यदि। माम् अप्रतीकारं। शस्त्रपाणयः धार्तराष्ट्रा। रणे हन्युः। तत्। मे क्षेमतरम् भवेत्।

**अर्थ :** ( निःशस्त्र होऊन असलेल्या मला )–प्रतिकार किंवा विरोध न करणाऱ्या मला–अर्जुनाला–हातीं शस्त्र घेऊन पुढें उभे असलेले, हे धार्तराष्ट्राः ( धृतराष्ट्रपक्षीय दुर्योधनादिक ) जरी मला ह्या रणभूमीवर मारतील, तरी तें मला अधिक कल्याणकारक होईल–[ पृथक् शय्या च नारीणां अशस्त्रवध उच्यते। ] (४६).

**आतां यावरी जे जियावें । तया पासुनि हें बरवें ।**
**जे शस्त्र सांडुनि सहावे । बाण यांचे ॥ २६६ ॥**

**ऐसे देखोनि सकळ । अर्जुने आपुलें कुळ ।**
**मग म्हणे राज्य हे सकळ । निरयभोगु ॥ २६७ ॥ (१).**

**इयावरि होय जितुके-अहो होय ये जितुके । ते मरणही वर निके ।**
**परि येणें कल्मषें । चाड नाहीं ॥ २६७ ॥ (२).**

**ऐसे तये अवसरिं । अर्जुन बोलिला समरिं ।**
**संजयो म्हणे अवधारिं । धृतराष्ट्रांते ॥ २६८ ॥**

जियावे = जगावें. पासुनि–पासूनि. शस्त्र–शस्त्रें. सहावे–साहावें (२६६). इयावरि–तयावरि. ये जितुके –जितुके. वर–वरि. निके = बरें, चांगलें, हितकारक. कल्मष = पाप. चाड नाहीं = गरज मुळींच नाहीं– कल्मषाची (आवड) चाड नाहीं. निरयभोगु = नरकांतील भोग (२६७). तये–तिये. अवसरिं = प्रसंगीं, वेळीं. समरिं–समरीं. संजयो–संजय. अवधारिं–अवधारीं (२६८).

अशी परिस्थिति असतांना, जीवितपणें जगावें, त्यापेक्षां मला तर उत्तम बरवें असें जें कांहीं वाटतें, तें म्हणजे हातचें शस्त्र टाकून (द्यावें, सोडावें व) देऊन, याचेच बाण ते साहण्याचें तें करावें–जीवित जगण्यापासून हातीं शस्त्र न घेतां, त्याचेच बाण उलटे सहन करावेत, हें बरें–(२६६)

अशा प्रकारांनीं चालिलें असतां, जें कांहीं होईल तेंच बरें होय–म्हणजे त्यांनींच उलट आम्हांवर बाणांचा वर्षाव करावा, तेथें मरण जरी आलें, तरी तें चांगलेंच होय. सद्गतीच त्यायोगें मिळणारी होईल कीं, जे का ह्या पापाची, कल्मषाची,* ह्या मलीन होण्याची, ह्या नरकांतील भोगाची मला मुळींच गरज नाहीं; तेथें थोडीहीपण गरज ठेवून, चाड धरून त्याशीं युद्ध करणें तें नकोच नको-(२६७)

संजय म्हणत आहे कीं—हे राजा धृतराष्ट्रा, ऐक कीं, असें जें कांहीं त्यावेळेस त्या रणांगणामध्यें अर्जुन बोलिला–तें ऐकावें–(२६८)

**संजय उवाच ।**

**एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥**

[संख्ये = युद्धाचे ठायीं, लढाईमध्यें. रथ उपस्थ = [रथ = गाडी, रथ, योद्धा, रथी, अवयव, पाय. उपस्थ = निकटचा, मांडी, मूळ (वृक्षाचें), मधला भाग, सारथी बसण्याची जागा,–पृष्ठभाग, तळ, छाती, जननेंद्रिय, रथाचा मधला भाग]. उपाविशत् = बसला. विसृज्य सशरं चापं = त्यागून बाण जोडलेले चाप का (बाणासहित चाप तें) टाकून देऊन, त्याग करून, सोडून देऊन–फेंकून देऊन बाण लावलेल्या चापाचें कार्य करून, म्हणजे फेंकून देऊन). शोकसंविग्नमानसः = शोकामुळें उद्विग्न, खिन्न, भयभीत, सविघ्न झालें आहे मन ज्याचें–शोकाकुलतेनें ज्याचें मानस खिन्न झालें आहे, उद्विग्न झालें आहे, भयभीत झालें आहे.]

| | | |
|---|---|---|
| **टीप :** सूत्र व्याकरण | इषुगमीयमान् छः | इष् – इच्छ<br>गम् – गच्छ<br>यम् – यच्छ |

* **कल्माषपाद्** नांवाचा एक राजा होता. ईक्ष्वाकु कुलोत्पन्न सुदास राजाचा पुत्र सौदास. यास वसिष्ठशापानें १२ वर्षें राक्षसत्व आलें होतें. दक्षिण हिंदुस्थानांतील शंकराचें पवित्र स्थान जें गोकर्ण त्याच्या दर्शनानें तें उशाःपाचें झालें.

**अन्वय :** संजय उवाच—अर्जुन संख्ये एवम् उक्त्वा-शोकसंविग्नमानसः सशरं चापं विसृज्य रथ उपस्थम् उपाविशत् ।

**अर्थ :** संजय म्हणाला, अर्जुन—याप्रमाणें भाषण केल्यानंतर, आपल्या हातांतील बाण लावलेलें धनुष्य–बाणासहित धनुष्य टाकून देऊन दुःखित होत्साता, आपल्या जागीं स्वस्थ बसला ; बसवल्या जाण्याच्या स्थितीस प्राप्त झाला, म्हणजे बसला–(४७).

मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवरूं आला ।
तेथें उडी घातली खाला । रथौनियां ॥ २६९ ॥

जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु ।
कां रवि हा राहुग्रस्तु । प्रभाहीनु ॥ २७० ॥

ना तरि महासिद्धिसंभ्रमें । जितला तापसु भ्रमें ।
मग आकळुनियां कामें । दीनु कीजे ॥ २७१ ॥

तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु ।
दिसे तेथें रहंवरु । त्यजिला तेणें ॥ २७२ ॥

मग धनुष्यबाण सांडिले । न धरत अश्रुपात आले ।
ऐसें ऐकें राया तेथें वर्तले । संजयो म्हणे ॥ २७३ ॥

आतां यावरि तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद पार्थु ।
कवणेपरि परमार्थु । निरोपील ॥ २७४ ॥

ते सविस्तर पुढारि कथा । अति सकौतुकें ऐकता ।
ज्ञानदेव म्हणे आतां । निवृत्तिदासु ॥ २७५ ॥

गहिंवरूं–गहिंवर = हुंदका. तेथें–तेथ. न धरत = अनावर असा; आवरून धरिला जाईना असा. उद्वेगला = खिन्न झाला, भयभीत झाला. रथौनियां = रथावरून. [(उद्वेग उदभ्रमः, उद्वेजन–) (पूगवृक्षस्य फलम् उद्वेगम् इति उच्यते ।) घोण्टा, पूगः, क्रमुकः, गुवाकः, खपुटः इति ५ पूगवृक्षस्य ।] (२६९)

राजकुमरु = राजकुमार. पदच्युतु (योगाच्युतु)–पदच्युत = हतवीर्य, निस्तेज. पद = स्थिति, आश्रय, अधिकार, दर्जा, पदवी, स्वरूप, लक्ष, एक रुपया, मार्ग, व्यवसाय, पादप्रवेश, विश्वास, पाऊल, ठसा. च्युत = पडलेला, नष्ट, भंगलेला, निवालेला. (च्युत आत्मन् = दुष्ट. अच्युत = दृढ, अविनाशी, विष्णु, कृष्ण, बळिराम, बारा सर्गांचें काव्यविशेष. अच्युतवासः = पिंपळ. रवि राहुग्रस्तु = (राहुमूर्धभिद् = विष्णु) राहु = दैत्य, देवशत्रु, पिशाच्च, सूर्य, हत्ती, राहु, मेघ, रात्र (रास ज्यो॰), वेश्या, घोणस वेळ, काळी मोहरी, दैत्य स्त्री. असुरद्विष् = देव, इंद्र, विष्णु इत्यादि. उपहतु–उपहत = ताडित, पीडित, ग्रस्त, वीज पडलेला, निंदिलेला, भ्रष्ट,

**टीप :** धर्मम्, पुण्यम्, श्रेयः, सुकृतम्, वृषः इति ५ सुकृतस्य । सुकृत = पुण्य, सुदैव, चांगलें करणें, पुण्यवान, दैवशाली, भाग्यवान्, भाग्यशाली, पुण्यपावन.

अघम्, अंहः, दुरितम्, दुष्कृतम्, किल्बिषम्, कल्मषम्, कलुषम्, वृजिनम्, एनः, पंकम्, पाप्मा, पापम् इति १२ पापस्य ।

दूषित. उपहत दश् = दिपून गेलेला. प्रभाहीनु = कळहीनः – प्रभा = प्रकाश, तेजकिरण, सावली, छाया, कुबेरनगरी. प्रभाकर = सूर्य, चंद्र, अग्नि, समुद्र, माणिक. प्रभाकीट = काजवा. तमः, राहुः, स्वर्भानुः, सौंहिकेयः, विधुंतुदः इति ५ राहोः। स्वर = स्वर्ग, आकाश, परलोक, स्वर्गामध्यें. स्वर्भानु = राहु. भानु = किरण, सूर्य, दिवस, सौंदर्य, स्वामी, राजा, (रुई, वनस्पति) सुंदर स्त्री. भानुफला = केळ. भानुमत् = सूर्य. कलाहीनु = [कला = स्त्रियांचा विटाळ, नौका, कपट, शरीरस्थ धातु रक्त, इत्यादि; कौशल्य, शिल्पकला (गीत, नृत्य इत्यादि); व्याज, शक्ति, मूर्ति, किरण, थेंब, चंद्राची कला, (सोळावा भाग) अंश, भाग. हीन = टाकलेला, रहित, न्यून, उणें, नीच, निंद्य, पदच्युत केलेला, अपूर्ण साक्षीदार]. राजकुमरु, राजपुत्र = राजकुमार, क्षत्रिय, बुध ग्रह, [पितळ, कांसें, चिचुंद्रि, इरसाल, आंबा, राजकन्या, रेणुका बीज, जाई, रजपूत (वैश्य व अंबष्ठ कन्या यांचा पुत्र)] (२७०).

महासिद्धिसंभ्रमें = रिद्धि = धनलाभव सिद्धि = अणिमादि यांच्या मोहानें व्याप्त झालेला. जिंतला–जिंतिला = कामवश = जित. [जितकाशिन् = जयानें शोभणारा, अजिंक्य म्हणून मिरवणारा. जित् = जिंकणारे. जितिः = जिंकणें. जि = जिंकणें, पादाक्रांत करणें, जिंकून मिळविणें, ताब्यांत ठेवणें, ताण करणें, वश करणें, उत्कर्ष पावणें, सर्वश्रेष्ठ होणें, घालविणें (रोग इत्यादि). जीव = जिवंत असणें, जगणें, निर्वाह करणें. निर्वाहार्थ आश्रयणें]. तापसु–तापस = तपस्वी. आकळुनियां कामें–आकळूनि कामें = वासनेनें, इच्छेनें, कामानें आटपून–जाणून घेऊन–आकळून. [आकलनं = विचारपूस, धरणें, (मेखलाकलन) बांधणें (आकळिला–दयाघन भक्ति आकळिल), मोजणें, इच्छा, जाणणें, बुद्धि, वर्णन]. दीनु–दीन = निर्धन, अनाथ, दुःखी, भित्रा, केंविलवाणा (२७१).

धनुर्धरु–धनुर्धर = (धन्वी, धनुष्मान्, धानुष्या, निषंगी, अस्त्री, धनुर्धरः इति ६ धनुर्धरस्य।) अर्जुन–शरधारिणः = काण्डवान्, काण्डीरः इति २।. अत्यंत दुःखे = फाजील अतिशय कायमचा त्रास, कष्ट, दुःख. (अत्यंत = अविनाशी, कायमचें, नेहमींचा पूर्ण). जर्जरु–जर्जर = पीडित. जर्ज(र्झ)रः। जर्झरितः। जर्झरीक = जीर्ण, वृद्ध, तुकडे झालेला, फाटलेला, छिद्रें पडलेला, पीडित. (१) इंद्रध्वज. (२) धूप, ऊद, शेवाळ. (१) भाद्रपद शु॥ १२स, धान्यवृद्ध्यर्थ उभारण्याचा ध्वज. (२) पाडव्याची गुढी. (३) वज्र (२७२).

अश्रुपात आले = डोळे पाण्यानें भरले–रडूं कोसळलें. ऐसें ऐकें राया तेथें वर्तलें–ऐसें एके राय वर्तले (२७३). परमार्थु–परमार्थ = सत्यत्व, खरेपणा, ईश्वरी ज्ञान, उच्च हेतु. निरोपील–निरुपील = (निरुपणं = पाहणें, आकार, शोध, चौकशी, व्याख्या, विचार, निदर्शन. निरोपील = निरोपाचें करील, सांगाव्याचें करील–संदेश, आदेश. निरुपित = नेमलेलें, दाखविलेलें, सोडलेलें, उद्युक्त. रोपणं = स्थापणें, रोप लावणें, उचलणें, व्रण बरा करणें (व्रणाचें औषध). नि = उपसर्ग–खालीं (निसद्), समूह (निकर), अतिशय (निकाम), आज्ञा (निदेश), कायमपणा (निविश्), कौशल्य (निपुण), थांबणें (निवृत्त), जवळ (निकट), इजा (निकृति), इत्यादि (२७४).

पुढारि = पुढील, पुन्हां पुढें असणारी. सविस्तर = सायंत, विस्तृत, (विस्तृतम् विस्तृतम् ततम् इति ३ लब्ध पसरस्य।). सकौतुकें–सकौतुक (कौतुक = इच्छा, उत्सुकता, जिज्ञासा, आनंद, उत्सव, क्रीडा, लग्नकंकण, स्वागत, गान, नृत्य, आश्चर्य). [कौतुकगृह–कौतुकागारं = जानवसा, क्रीडागृह. कौतुकक्रिया = लग्न.] [स्नानादि (सास्ना गाय बैल इत्यादि, मानेखालची पोळी)]. साकं = एककालीं, बरोबर, सह. साम्य = समवृत्ति, एकोपा, सादृश्य, बरोबरी, तुल्यता. संज्ञः = फेंगडा. षोडशांगः = सोळा द्रव्यांचा गुग्गुळ धूपविशेष. षोडश ऋचं = पुरुषसूक्त. षोडश मातृका = गौरी, पद्मा, इत्यादि सोळा देवता. [पुण्याहवाचन] (२७५).

तेथें मग अर्जुन अत्यंत खिन्न झाला, भयभीत झाला, त्यास अनावर असा हुंदका आला, कांहींहि केल्या गहिंवर त्यास आलेला तो मुळींच आवरेना, तेव्हां तेथें त्यानें रथामधून खालीं उडीच घातली-(२६९)

तेव्हां तो कसा दिसला म्हणावा तर-जसा का सर्वथैव उपहत, निद्रिलेला (वीज पडलेला जसा) ग्रस्त असा; अथवा जसा का रवि राहूनें ग्रस्त झालेला, प्रभाहीन (कुबेरनगरी प्रमेपासून टाकलेला, ढकललेला), (हतवीर्य असा निस्तेज झालेला), आपल्या दर्जापासून ढळलेला, निवालेला, पडलेला राजकुमर [राजपुत्र क्षत्रिय, बुध ग्रह (रजपूत का म्हणाना)] तेजकिरणरहित अथवा जीवितकळाहीन असा निर्जीव दिसावा-देहधारण मूर्तीचे असलेलें तें मूर्तिरहित झालेलें जसें व्हावें-(२७०)

अथवा महासिद्धीच्या भ्रांतीनें-धनलाभ व अणिमादीच्या मोहानें व्याप्त झालेला, भ्रांतीनें त्यास ग्रासल्या-मुळें विषयवासना, इच्छा, कामवश असा तपस्वी आटपून घ्यावा, पादाक्रांत केला जावा, व मग जसा तो भित्रा, अनाथ, दुःखित, केंविलवाणा असा व्हावा-केला जावा-(२७१)

तसा तो धनुर्धर अर्जुन, जसा का कायमच्या (फाजील) अशा अतिशय त्रासानें, कष्टानें, दुःखानें पीडित झालेला तो-त्यानें रथ त्यजिलेला, त्यजिला आहे असा दिसला-अतिय दुःखानें जर्जर झालेला असा दिसला-त्यानें रथ आतां त्यजिला, रथांतून बाहेर उडीच घातली जशी का-(२७२)

वर धनुष्य, बाण लावलेलें तें टाकून दिलें, डोळे पाण्यानें भरले. आवरेचनात असे अश्रुपात आले, रडेंच कोसळलें, असें हे राया धृतराष्ट्रा, तेथें घडलें-असें संजय म्हणत आहे-(२७३)

आतां यावर-यानंतर हल्ला करण्यास कठीण असें दुर्धर्ष जें वैकुंठ, तेथचा वैकुंठनाथ, विष्णुलोकचा स्वामी श्रीभगवान्, पार्थास-आंत खेदयुक्त, थकलेला, श्रमलेला, दुःखित, शोकग्रस्त, ग्लानी आलेला, इंद्रियांवर ताबा नसलेला असा-असा पाहिल्यानें कशा तऱ्हेनें, कसल्या त्या परीनें-उत्तम हेतु, सत्यत्व, ईश्वरी ज्ञान तें निदर्शनाचें करील, निरुपील, आकारास आणील हें पाहूं या-(२७४)

अशी ती सायंत, सविस्तर, विस्तृत अशी कथा पुढें आलेली आहे-तेथें आनंद, उत्सव, क्रीडा, लग्नकंकण, जिज्ञासा, स्वागत, गान, नृत्य, आश्चर्य असें ती ऐकण्यानें वाटेल, असें श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव आतां म्हणत आहेत-(२७५)

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥
[श्लोक ४७. ओंव्या २७५. एवम् ३२२. श्रीकृष्णार्पणमस्तु।]

**॥ ॐ तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

---

**टीप:** पौर्णिमेस चंद्राला ग्रहण लागतें-(दर्शपुर्णेंदुसंगम-) अमावास्येस सूर्याला लागतें-येथें पौर्णिमेस मारुतीचा जन्म झाला म्हटलें. सूर्योदयीं, सूर्य हें एक फळ (लागलेलें) आहे असें समजून, तो त्यास-सूर्यास-भेटण्यास, गिळण्यास गेला, तेव्हां राहूनें [राहूस विधुतुंद म्हटलें, तो चंद्रासच त्रास देणारा, द्विजराज चंद्र म्हटलें. राजकुमर बुध म्हटलें.] कागाळी केली इंद्राकडे कीं, हा कोण आला मला छळण्यास, अडवण्यास-तेव्हां इंद्रानें आपल्या वज्रानें मारुतीची हनूच हाणली-(म्हणून यास 'हनूमत्' नांव पडलें) तेव्हां वायु(चा पुत्र जो मारुती) हा तेथें हजर होऊन, त्यानें मारुतीला पोटाशीं धरिलें, तेव्हां सर्व प्राणीमात्रांच्या ठायींची हनूच मुळीं आकर्षिली गेली-प्राणिमात्रांचा प्राणच आकर्षिला गेल्यानें-प्राणीमात्रांची अशी दशा होऊं लागल्यानें (त्याच्याकडून प्राणिमात्राकडून) इंद्रादिदेवांकडून मारुतीस अनेक वर प्राप्त झाले-दिले गेले-त्या शक्तीमुळें मारुती ऋषींचे मठ वगैरे उध्वस्त करूं लागला, तेव्हां त्याचे ते वर श्रीरामावतारीच तेवढे उपयोगाचे ठरतील, असा निर्णय मारुतीला शक्तीबद्दल दिला गेला.